# सृष्टींतील चमत्कार.

## NATURE'S WONDERS.

[Maráthí.]

परमेश्वराचीं कृत्यें मोठीं; त्यांवर ज्यांची आवड आहे, त्या सर्वां-
कडून तीं शोधलेलीं आहेत.—गीत १११, ओ० २.






BOMBAY TRACT AND BOOK SOCIETY.
A. D. 1853.

---

मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.
सन १८५३.

# अनुक्रमणिका.

# सृष्टींतील चमत्कार.

---

## प्रकरण १. अरण्यसंगीत अथवा प्रकृतीचे नाद.



राबट ह्मणून एक मुलगा होता, तो पर्जन्य काळांत पावसाच्या झडीमुळें दोन अडीच महिन्यांपर्यंत घरांतच अडकून राहिला. पुढें भाद्रपदाच्या महिन्यांत अकस्मात पाऊस उघडून आकाश अगदीं निरभ्र झालें, आणि बाहेर फिरायास जाण्याची त्यास फार उत्कंठा मास झाली. तेव्हां तो आपली बाग व तींत एकांतीं बसावयाकरितां केलेली गुंफा हीं वारंवार जाऊन मोठ्या आनंदानें पाहूं लागला; आणि आपण लावलेल्या झाडांची बरदास्त राखावी या हेतुनें पावसाच्या थेंबानीं आपली गुंफा जी विशोभित होऊन गेली होती ती नीट करण्याकरितां फार झटूं लागला.

एका दिवसीं प्रातःकाळीं चांगली उघाड पडलेली पाहून हा लहान मुलगा आपल्या आईस ह्मणतो, "आई, आतां पाऊस खराच उघाला. पाहा, उन्हें कसीं पडलीं आहेत. आणि जमीन कसी कोरडी झाली आहे ती, तर चला आपण रानांत जाऊं आणि गोगलगाईचीं पटयापटयाचीं घरें मिळवून माझ्या गुंफेंत आणून ठेवूं. अशा रम्य दिवसांत आपलें काम ठेवून मजबरोबर फिरायाला येसील आई?

त्याच्या आईने उत्तर केलें, होय येईन मुला; आपण बाहेर फिरायास गेलों तर आपला काळ निरर्थक जाणार नाहीं, कां कीं व्यायाम शरीरास आरोग्यकारक आहे, आणि त्यांत आपलें दोघांचेंहि हीत आहे. पाहा मी फिरून आलें ह्मणजे आपलें काम मोठ्या हुशारीनें करूं लागेन आणि तूंहि मोकळा फिरून आलास ह्मणजे स्वस्थ होसील आणि मग तुला शिकायाला हौस वाटेल.

त्यांची तयारी झाल्यावर, राबट यानें गोगलगाईचीं घरें व दुसरें अवांतर चमत्कारीक पदार्थ सांपडतील ते भरून आणण्याकरितां एक लहानसी टोपली बरोबर घेतली.

मग तीं फिरत फिरत एका हिरव्या कुरणांत गेलीं, तेथें त्याच्या खालच्या बाजूस एक नदी होती व पलिकडे एका उंच टेंकडीवर मोठमोठाले वृक्ष वाढले होते, आणि त्या टेंकडीच्या शिखरावर एक बुरुज होता त्याकडे पाहिलें तर तो आतांच आंगावर कोसळून पडेल असा दिसत असे.

ही मौज पाहून त्या मुलास फार आनंद वाटला आणि तो आईस ह्मणाला, "आई, इकडे संपूर्ण विश्व किती सुंदर दिसतें! आणि पाहा, एथें निवांतहि किती आहे तें! इतकें निवांत असण्याचें कारण काय असेल आई?

त्याच्या आईने उत्तर केलें, बाबा, मला तर पुष्कळ प्रकारचे शब्द ऐकूं येतात; आणि ते निरनिराळे आहेत तरी त्या सर्वांचा मिळून एकच सुस्वर नाद निघतो आहे. ऐकिलास.—

राबट ह्मणाला, आई, नको नको, तूं मला सांगूं नको, मलाच त्याविषयीं यत्न करून तो कोठून निघतो तो शोधून काढूं दे.

आ०— आहा! तूं आकाशाकडे पाहतोस तेथें तुला काय ऐकूं येईल?

रा०— एक लहान पक्षी गात आहे काय? मला कोठें दिसत नाहीं तो.

आ०— थांब, तो पक्षी कोठें आहे हें तुला दाखवितें. तो पाहा चिमणासा चंडोल गात बसला आहे. दिसला? अरे अणखी तेथें दोघे तिघे मिळून गातात. पाहा हे इकडे एका हारीनें उठून खालीं येत आहेत, आतां ते खालीं वर झेपा घालूं लागले, आणि फार आनंद झाला ह्मणून अवघा वेळ गात आहेत.

रा०— आई, ते वर काळे डाग डाग दिसतात, तेचना? मला आश्चर्य वाटतें, त्यांच्यानें इतक्या तेजस्वी सूर्याकडे कसें पाहवत असेल?

आ०— लेंकरा, मैना, कोकीळ, गोवें, झोरें या पक्ष्यांप्रमाणें ते आपलीं मंजुळ गाणीं उन्हाच्याच दिवसीं गातात, यास्तव तूं अमळ लक्ष लावून पाहसील तर पक्ष्यांच्या पाहाटच्या रागावरून आज उघाड होईल किंवा कसें हें समजायाचें ज्ञान तुला येईल.

रा०— खरेंच आई, ह्मणून मला वाटतें, जेव्हां लुसी ही तुला विचारी कीं मी कपडे वाळत घालूं, हमाल आह्मास फिरावयास नेईल, तेव्हां तूं ह्मणेस कीं थांब बेटा, पक्षी काय बोलतात तें मला ऐकूं दे, त्यावरून मला चमत्कार वाटे कीं पक्ष्यांच्या बोलण्यावरून तुला कसें समजतें आणि तसे तुझे तर्क बरोबर उतरत.

आ०— होय, मी नुसती पक्ष्यांच्या स्वरावरून तर्क करी, कांकीं सरदीच्या दिवसांत किंवा आकाशांत अभ्रें येतात तेव्हां पक्षी स्तब्ध राहतात, कदाचित थोडीसी चिवचिव मात्र केली तर करितात. त्यावरून कोणास वाटेल कीं ते जसें आपलें घरकुडें कसें बांधावें किंवा आपलीं लहान पिलीं कशीं वाढवावीं याची मसलत करीत असतील.

रा०— आहा किती चमत्कार हा! अणखी मला आठवण झाली आई. मागें एकदां तूं सांगितलें होतेंस कीं, सकाळीं आणि संध्याकाळीं पक्षी निरनिराळ्या तऱ्हेचे राग गातात.

आ० — होय बाबा, परंतु मोठमोठे विद्वान लोक त्यांच्या गाण्याचे अणखी पुष्कळ भेद समजतात; आणि त्यांच्या शब्दावरून सांगतात कीं, अमुक पक्षी भ्याला आहे, किंवा दुसऱ्यास बोलावित आहे, कुमक करीत आहे, आगतस्वागत करीत आहे, रागें भरला आहे, किंवा संकटांत आहे; असो, हे बारिक भेद जर कोणत्याहि मनुष्यानें नीट लक्ष लावून पाहिलें तर समजण्यासारिखे आहेत.

गा० — आई, असें आहे तर मलाहि त्यांचे निरनिराळे शब्द ऐकावेसे वाटतात.

आ० — फार लांब जावयास नको मुला, आपल्याच वाड्यांत कोंबडी आहे ती कसकसे शब्द करीत असतो त्याकडे लक्ष दिल्हेंस ह्मणजे तुला कळेल. आपल्या पिलांसाठीं कांहीं धान्य किंवा बारिक जीव सांपडले ह्मणजे ती त्यांस आनंदाचा शब्द काढून कसी बोलावीत असतो आणि ससाणा तिच्या पिलांवर झेप घालतो किंवा एकादी मांजर त्यावर टपत बसती तेव्हां त्यांस आपल्या पंखाखालीं घेऊन कसा भयंकर शब्द करिती, तसाच कावळा तिच्या पिलांपुढून धान्याचे दाणे टिपूं लागला ह्मणजे ती रागावून आपला शब्द कोणत्या स्वरानें काढती त्याकडे चांगलें लक्ष लावून पाहिलेंस तर तें सर्व तुझ्या ध्यानांत येईल.

गा० — तर सर्व पक्षी आपले शब्द ह्याचप्रमाणें फिरवितात!

आ० — होय, पण जसे त्यांचे आवाज असतील त्याप्रमाणें. कावळ्याला बुलबुलाप्रमाणें किंवा मोराला कोकिळेप्रमाणें बोलतां येणार नाहीं.

गा० — आहा! मोराला इतका सुंदर सांगा असून त्याचा शब्द कर्कश असावा ही मोठी शोकाची गोष्ट आहे आई!

आ० — असें ह्मटलें आहे कीं सुंदर पिसें आणि मधुर वाणी एका ठिकाणीं क्वचितच सांपडतील, आणि हें ह्मणणें वास्तविक आहे.

गा० — आई, तूं लहान सुंदर गुंगणाऱ्या पक्ष्यांविषयीं विसरलीस वाटतें.

**आ०**— विसरलें नाहीं मुला; त्यांच्या स्वरावरून कांहीं त्यांस गुंगणारे पक्षी ह्मणतात असें नाहीं तर ते एका फुलावरून दुसऱ्या फुलांवर मधाच्या किंवा दुसऱ्या लहान प्राण्याच्या शोधार्थ झपाट्याने उडतात तेव्हां त्यांचे लहान पंख वाऱ्याने गुंगावतात त्यावरून त्यास तें नांव पडलें आहे. हे प्राणी तेजस्वी दिसतात तरी ते चांगले गाणारे नव्हत.



माणीककंठ गुंगणारा पक्षी.

**रा०**— आई, पक्ष्यांचे राग निरनिराळे असतात किंवा कसें?

**आ०**— आपल्या माहितीच्या अशा पुष्कळ पक्ष्यांस त्यांचे त्यांचे स्वतांचे राग आहेत; परंतु एकाचा राग ऐकून त्याच सारिखा काढून दाखविणारे असेंहि पक्षी पुष्कळ आहेत; कांहीं जातीचे पक्षी नक्कल करण्यांत असे हुशार आहेत कीं एकाद्या पक्ष्याचा राग ऐकून त्यासारिखा हुबेहुब गाऊन दाखवितील आणि ज्याला तितकी माहिती असेल किंवा ज्याचे कान तसे तिखट असतील तोच त्यांचा भेद सांगेल. अणखी एक चमत्कारिक थट्टा करणारा पक्षी आहे मुला, तो तर राहून राहून असे परोपरीचे राग काढितो कीं त्यावरून आसपासच्या लोकांस निरनिराळे पक्षी गात आहेत असा भास होईल.

रा०— आई, बरें, लहान पक्षी आपोआप गावयास शिकतात किंवा त्यांचे आईबाप त्यांस शिकवितात?

आ०— आपोआप नाहीं, त्यांचे आईबाप त्यांना शिकवितात. त्यांत उत्कृष्ट गाणारे ह्मटले तर नर जातीचे पक्षी, मादी जातीच्यांस तितकें चांगलें गातां येत नाहीं. मी एकदा आजारी पडलें होतें तेव्हां एक लहान पक्षी पहिल्यानें गावयास कसा शिकत होता तें ऐकून मला माझ्या एकांत खोलींत मोठी कर्मणूक झाली. अणखी म्या एका लहान बुलबुलाची असी गोष्ट ऐकिली आहे कीं जेव्हां त्याला शब्द फुटला तेव्हां तो आपणच खुशीने गाणें शिकूं लागला, आणि एक लहानसा चुटका पाठ यावा ह्मणून तो एकसारिखा साहा साहा घटिका घोकीत बसे.

रा०— बरें, एकादा लहान पक्षी त्याच्या आईबापाजवळून दूर करून पिंजऱ्यांत वाढवून शिकविला तर तो गाईल कीं नाहीं?

आ०— नाहीं मुला. तसें केलें तर तो चिवचिव मात्र करील, परंतु तो नुकतासाच स्वर काढूं लागला आहे आणि त्यांच्या जवळ कोणी गाणारा पक्षी आणून ठेविला तर तो त्यासारिखा गाऊं लागेल, यावरून मला वाटतें, त्यांस शिक्षा नसली तर ते चांगले गाणार नाहींत.

रा०— पक्ष्यांचें गाणें तालसुरावर लिहितां येईल आई?

आ०— होय प्रिय मुला, कित्येक पक्ष्यांचें लिहितां येईल. वास्तविक, मनुष्यांस गायनकला व तिचे तालसुर हे प्रथम पक्ष्यांपासून प्राप्त झाले.

हें भाषण करीत करीत राबर्ट व त्याची आई अरण्यांत जाऊन पोहंचली, तेथें शीतळ मंद अशा वायूच्या योगानें त्यांस अत्यंत समाधान झालें. डोईवर झाडांच्या नव्या फुटलेल्या पालवींत सुस्वर गायन चाललें होतें, व जवळच्या शेतांतून गाऱ्याचा नाद खोल परंतु तालसुरानें युक्त, असा राहून राहून ऐकूं येत होता.

रा०— आई, तेथें तो खिळखिळ पक्षी किती हिडीसवाणा शब्द करितो; खचित लोक अशा पक्ष्यापासून गावयास शिकले नसतील.

**आ०**— खरेच नसतील बाबा; तो पक्षी तर गायन अगदीच बेताल करून टाकील.

**रा०**— आई, तेथें तो रानहोला पाहा! कसा घुमत आहे, आहा! अणखी तेथें कोकिळाहि आहे, तीं असी कुहू पिहू काय करिती, मला वाटतें, तिला गातां येत नाहीं.

**आ०**— तिचा शब्दच तसा आहे, परंतु तो कानास फार मंजुळ लागतो. नुऱ्या व मैना याहि बोलायास शिकतात; एका शिकविलेल्या डोंबकावळ्याची असी गोष्ट सांगतात मुला, कीं, शाळेंतील उनाड मुलांस पंतोजी जसी धमकी देऊन ह्मणतो, "खबरदार पोरानो, मारतों, मारतों, तुमची खोडच मोडून टाकीन," त्याप्रमाणें तो डोंबकावळा तसे धमकीचे शब्द बोलून कित्येक खोडकर पोरांस छळीत असे.



पेनग्विन पक्षी.

**रा०**— होय होय, आजोबाचे शाळेंतहि एक पाळलेला डोंबकावळा होता, त्याच्या तरी ते फार चमत्कारिक गोष्टी सांगत असत.

**आ०**— पोपट आणि काकाकव्वा ह्या जातीचेहि कित्येक पक्षी बोलायास शिकतात, तसेच अमेरिका देशांतहि पुष्कळ बोलणारे

पक्षी आहेत. त्या देशांत पेनग्विन नामक पक्षी आहेत त्यांचा शब्द तर जसीं मनुष्यें दुरून बोलताहेत असा ऐकूं येतो ह्मणून तारू फुटण्याच्या प्रसंगीं त्यांचा शब्द ऐकून नावाड्यांस, माणसें जवळ आहेत असा भास झालेला आहे. तशांत ह्या पक्ष्यांस आं-खुड पंख व पांढरे ऊर असतात त्यावरून ते नावाडी अधिकच भ्रांतींत पडून त्यांस असें वाटतें कीं, हा शुभ्र पोषाक केलेला ल-हान मुलांचा थवा आंधारांत बसला आहे. दक्षिण अमेरिकेंत दुसरा एक जातीचा पक्षी आहे त्याचा शब्द स्पष्ट घांटेसारिखा निघतो, त्या शब्दाने तेथील अरण्यें नादयुक्त होतात. आणि मुला, पक्ष्यांच्या गाण्याचे प्रकार जे मला ठाऊक आहेत त्यापे-क्षांहि असंख्यात आहेत.

**रा०**— आई, सर्व गाणारे पक्षी लहानच असतात हें कसें? ससाणा, राजहंस, गीध, ह्यासारिखे मोठमोठे पक्षी तर अगदींच गात नाहींत?

**आ०**— खरेंच ते गात नाहींत, आणि ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. मुला, गाण्याचा गुण हा नुसता लहान प-क्ष्यांसच दिल्हा आहे.

**रा०**— ह्याचें कारण काय असेल बरें?

**आ०**— माझ्या प्रिय मुला, ईश्वराने हा बंदोबस्त मोठ्या शाहाणपणाने करून ठेविला आहे, असें दिसतें. पाहा, लहान पक्षी आपल्या घरकुंड्यांत बसून गात असला आणि तें ऐकून त्या-चा कोणी शत्रु तेथें गेला तर त्याच्या लहान आकृतीमुळें त्याला झपकन झाडापानांत कोठें तरी लपतां येईल, तसें मोठ्या पक्ष्यांस येणार नाहीं.

**रा०**— आई, कोंबडी जातीचे पक्षी कां बरें गात नाहींत? जर ते गातील तर लहान पिलीं पांख फुटून इकडे तिकडे फिरूं लागत तोंपर्यंत त्यांस बरींच करमणूक होईल.

**आ०**— त्यालाहि तेंच कारण आहे, राबट. कोंबडी आपल्या घरकुंड्याची संभाळ करणारी आहे आणि तीच जर गाऊं लागेल तर ससाणा, घार, यासारिखे घातक पक्षी अथवा दुष्ट पोरें जीं

तिचीं आंडीं शोधीत फिरतात, त्यांस ती पिल्लांसुद्धां आयतिच सांपडेल. त्यांस कर्मणूक पाहिजे ह्मणतोस तर ती कोंबडा करील तशांत शत्रु आलाच तर जसें टिटवीने लंगडत चालून आणि पाय मोडला ह्मणून दुःखाचा स्वर काढून तुला पुष्कळ वेळा करून दाखविलें, तसें ती कोंबडा ओरडत ओरडत त्यास फसवून तेथून दुसऱ्याकडेस नेईल.

**रा०**— खरेंच आई, जेव्हां मी त्या लहान पक्ष्यास असें करितांना पाहीं तेव्हां मला वाटे कीं मी त्यास सहज धरीन, परंतु धरायास गेलों ह्मणजे तो हरएक प्रयत्नाने माझ्या हतांतून निसटून जाई, असें करितां करितां शेवटीं एकाएकीच त्याचा पाय बरा झाला आई, आणि तो मोठ्या आनंदाने उडून गेला.

**आ०**— त्याने लंगड्याचें मिस घेतलें त्याचें कारण तूं समजलास, पाहा? तूं चुकून त्याच्या घरकुंड्याकडे गेला होतास तें त्यास न आवडून तुला तेथून ठकवून न्यावयाकरितां त्याला जितका प्रयत्न सुचला तितका त्यानें केला.

**रा**— अरे धूर्ता! आई, कोंबडी जातीच्या पक्ष्यांस अगदींच गातां येत नाहीं?

**आ**— त्यांस पिंजऱ्यांत बाळगलीं तर तीं गातील, परंतु त्यांचा स्वर नर जातिपेक्षां फार हलका व बारीक निघतो.

**रा०**— एका जुन्या झाडाखालीं एकाएकीच थांबून ह्मणतो, आई! ऐक ऐक हें टाप टाप काय वाजत आहे? ह्या झाडांत तर कांहीं नाहीं ना?

**आ०**— बाबा, तो सुतार किंवा पाथरवट पक्षी असावा, झाडाच्या सालींत कीटक शोधीत असतां जेव्हां तो आपली चोंच सालीवर मारतो तेव्हां तिचा टाप टाप असा आवाज होत असतो.

**रा०**— आई, आतां तूं कीटकांचें प्रकरण काढलेंस वाटतें, ठीक मधमाशा आणि भ्रमरकीटक यांचें गुंगणें मला जरा जरा ऐकूं येतें.

**आ०**— आहा! रानांतल्या किंवा पाळलेल्या मधमाशा वसंत ऋतूंत सकाळच्या वेळीं काय शोभा देतात!

रा०— आई, बागेंतील मधमाशाच्या पोळ्यांत निवांत ह्मणून कधींच दृष्टीस पडत नाहीं, हिंवाळ्यांत मात्र त्यांच्याने फारसा उद्योग करवत नाहीं; तेव्हां कायतें तेथें निवांत असतें.

आ०— मधीच्या पोळ्यांतहि निरनिराळ्या काळीं निरनिराळा ध्वनी ऐकूं येतो. एकादा वेळीं जागेच्या संकोचामुळें यांतून कांहीं तरुण मधमाशा आपलें पोळें सोडून दुसऱ्या ठिकाणीं जावयास निघतात तेव्हां हे प्राणी एकदांच घोंगाऊं लागतात त्यासमयीं मधमाशांचे पाळणारे आहेत त्यांस यांचा बेत काय आहे तो वरचेवर समजतो. तसेंच जेव्हां त्यांची राणी मरती तेव्हां एकादी नवी होईपर्यंत त्यांचा मोठा गोंधळ चालत असतो.


काम करणारी मधमाशी.


मधमाशांची राणी.

रा०— आई, एकाच समयीं त्यांत दोन राण्या राज्य करूं लागल्या तर मग कसें होत असेल बरें?

आ०— अशा प्रसंगीं त्यांचे दोन पक्ष होतात, त्यांतून एका पक्षाकडील प्राणी तिकडून वेगळे निघून न गेले तर दोहोंतून एक राणी मरेपर्यंत आंतले आंत मोठी लढाई होती, मग जी जय पावती तिच्या हुकुमांत सर्व राहतात.

रा०— काय चमत्कार हा! आई, त्या दिवसीं आपण बाहेर घोड्यावर बसून फिरायाला गेलों होतों तेव्हां आपण त्या किनाऱ्यावरच्या बिळांत घुंगतानां पाहिलें त्याची तुला आठवण आहे!

आ०— होय आहे, तो भ्रमरकीटकाचा घरकुंडा होता मुला, कोणी त्यांतील प्राण्यांस छेडलें याजकरितां ते रागें भरून

तसे घुंगत होते, ह्मणून तुझ्या वडिलाने त्या भ्रमरकीटकापासून दूर जाण्यासाठीं आपला घोडा रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस काढून घेतला, कारण ह्या प्राण्यांस एकदा छेडलें तर कोणीकां असेना त्याला झोंबायास ते चुकणार नाहींत.

रा०— मधमाशा आणि भ्रमरकीट यांसारिख्या चिमुकल्या प्राण्यांसहि भाषा असावी काय?

आ०— राबट, परस्परांची भाषा ते असी समजतात कीं घरकुंड्यावरील पाहरेकऱ्याच्या दृष्टीस एकदा शत्रु पडला तर तो आरोळी करूं लागतो मग त्यासरसीच त्यांची एक मोठी टोळी बाहेर पडती आणि तो बिळांत घुसणारा शत्रु त्या सर्वांच्या शक्तीपलिकडे नसला तर त्यावर तुटून पडून त्यास ठार मारून टाकितात.

रा०— आई, साधारण माशाहि घुंगतात?

आ०— होय, आणि पुष्कळ कीटकहि आपल्या पांखाच्या त्वरीत गतीने घुंगत असतात. चिलटें पाहशील तर एक मौजेचाच सूर काढितात आणि ह्याप्रमाणें तीं सूर काढूं लागलीं ह्मणजे तीं करणा वाजवितात असें लोक त्यांस ह्मणत असतात.

रा०— वा! तर मग चिलटें चावायास आलीं ह्मणजे आपल्याला सावध करायास त्यांच्या करण्याचा आवाज फार उपयोगी आहे; बरें सुतेरे घुंगतात कीं नाहीं?

आ०— नाहीं. त्यांच्या जाळ्यांत जो शब्द ऐकूं येतो तो माशी किंवा चिलट आंत गुंडाळतें त्याचा.

रा०— आई, मला राळीची चिणचींण ऐकावीसी वाटती, परंतु ती कधीं माझ्या दृष्टीस पडत नाहीं हें कसें?

आ०— त्याचें कारण असें आहे कीं, घरांत राहणाऱ्या राळी मोठ्या पक्या असतात, त्या मनुष्याच्या समक्ष आपल्या बिळांतून कधींच बाहेर पडत नाहींत; आणि शेतांत ज्या कित्येक जातीच्या असतात त्यांचा रंग केवळ जमिनीच्या रंगासारिखा असतो तेणेंकरून त्याहि ओळखायास अवघड पडतें. तशांत त्या उड्या

मारणाऱ्या फार चपळ आहेत त्यामुळें त्यांचा पाठलाग करून शोध काढवत नाहीं.

रा०— आई, कित्येक कीटकांचे शब्द कानीं पडले तर दुःशकुन किंवा मृत्युभय आहे असें लोक ह्मणत असतात तें काय?

आ०— माझ्या प्रिय राबट, मनुष्यानें विचार न करून याप्रमाणें भलभलतेंच मानावें हें मोठें नवल आहे.

रा०— पण आई, सापानें हवा नामक स्त्रीबरोबर भाषण केलें आणि बालाम याच्या गाढवानें आपल्या धन्यावर ठपका दिल्हा असें धर्मपुस्तकांत सांगितलें आहे, तें कसें?

आ०— बाबा, धर्मपुस्तकांत सांगितलेल्या सापाविषयीं ह्मणशील तर सैतानच त्यांत संचार करून बोलला, आणि बालाम याचा गाढव साक्षात ईश्वराच्याच सामर्थ्यानें बोलला, तर ह्या दोन गोष्टी ईश्वराचें लाघव आहे हें उघड आहे; परंतु कीटकांचें बोलणें ही गोष्ट वेगळी आहे.

रा०— आई, कांहीं कीडी रात्रीच्या गातात, नाहीं बरें?

आ०— होय, कोणी ग्रंथकारानें ह्मटलें आहे कीं, जसें किडींनी आपल्या उत्पन्नकर्त्या ईश्वराच्या स्तुतीचा घोष वर्षभर रात्रंदिवस करावा ह्मणून प्रतिज्ञाच केली आहे.

राबट व त्याची आई मखमलीसारिख्या मऊ चारीवरून असीं हलक्या पावलानी चालत होतीं कीं, खारी व ससे यांस त्यांची चाऊल न समजतां तीं आनंदानें त्यांच्या समोर खुशाल नाचत होतीं, इतक्यांत राबट ह्मणतो, आई, आतां हा नवाच शब्द कोणत्या प्राण्याचा ऐकूं येतो बरें?

आ०— एथें ह्या लहान पुष्कळ खारी उड्या मारीत आहेत त्यांचा वाटतें, चतुष्पदेंहि थोडासा शब्द काढितात. जर तूं क्षणभर लक्ष देसील तर तुला आज सकाळच्या गाण्यांत किती प्राण्यांचे राग मिसळले होते ते समजतील, मला वाटतें त्यांतून तुला कित्येकांची आठवणाहि असेल. आतां तूं राबट हें झाड खालीं पडलें आहे यावर बैस आणि तुला किती जनावरांचे शब्द ऐकूं येतात ते मोज.

त्याची आई बसल्यावर राबट हा चित्त देऊन उभा राहिला आणि तत्क्षणींच हृष्यवदन करून ह्मणतो, "आई, मला गाईचा व वांसराचा; मेंढयाचा व कोंकराचा; डुकराचा, कुत्र्याचा, मांजराचा; घोड्याचा, आणि गाढवाचा असे नऊ निरनिराळे जनांवराचे, याशिवाय पुष्कळ पक्ष्यांचे व कीटकांचे आणि डोईवरील ह्या खारीचें शब्द एकदांच ऐकूं येतात."

**आ०**— राबट, मला तर अणखी एका चतुष्पदाचा शब्द ऐकूं येतो. हा राहून राहून बारीक चूंचूं आवाज होत आहे त्यावरून मला वाटतें कीं, मांजराने शेतांतला उंदिर धरला असेल आणि तो तिच्या हातांतून निष्टून जाण्यासाठीं काय काय प्रयत्न करितो तें क्षणभर पाहून मग त्यास खावें अशा बेतांत ती बसली असावी.



**रा०**— काय द्वाड मांजर! जर तिला उंदिर खावयाचा आहे तर त्याला एकदांच कां मारून टाकीत नाहीं, त्याचे हाल हाल कां करिती?

**आ०**— माझ्या बा, तें तसें नाहीं. तुला वाटतें तीं द्वाड आहे, पण मी ह्मणतें तिचा अंगस्वभावच तो. राबट, तूं मात्र सांभाळहो, नाहीं तर एखाद्या जिवंत प्राण्यास ठार मारायाचें अगत्य पडल्यास त्या मांजरासारिखें करसील.

**रा०**— आई, पक्ष्यांच्या शब्दासारिखे जनावरांचे शब्द तितके मंजूळ नाहींत.

**आ०**— मुला, पशूंस बहुत करून कांहीं व्हावें असलें तरच ते ओरडतील, आणि ते तृप्त असले तर त्यांस उगीच बसण्यांत मोठा आनंद वाटतो; वानरांचा मात्र निराळा प्रकार आहे, त्यांस आनंद होतो तेव्हां ते अतिशय किलकिलाट करूं लागतात.

**रा०**— आई, माऊला आनंद झाला ह्मणजे ती नुसती घुर-घुरूं लागती कांहीं स्पष्ट शब्द करीत नाहीं.

**आ०**— तसा सिंहहि करीत नाहीं मुला, त्याला भूक लागली किंवा राग आला ह्मणजे मोठ्यानें गर्जना करितो आणि लांडगा जो आहे तो भोबावतो; ती गर्जना व भोबावणें मनुष्यास सावध करा-यास फारच उपयोगाचीं आहेत हो.—

**रा०**— खरें, आई ह्मणूनच पाळलेले सिंह आणि आस्वली यांस खावयास दिल्हें ह्मणजे मुकाट्यानें बसून राहतात.

**आ०**— होय त्याच कारणासाठीं तीं तसीं बसतात, तसेंच त्यांचा चारा आणायाची वेळ झाली पुरे, ह्मणजे तीं किती हालहूल करितात तें तुला ठाऊक असेल. असो, पण राबट कोणी मला असें सांगितलें आहे कीं, जंगलांत श्वापदें जीं आरोळ्या मारितात त्या इतक्याच कारणावरून असें नाहीं.

**रा०**— आई, साप कांहीं शब्द करितात?

**आ०**— होय, त्यांस छेडलें तर ते फुसकारतात, आणि एका जातीचा साप आहे तो आपल्या शेपुटांतलीं सुटीं हाडें वाजवितो.

**रा०**— बेडूक आणि चामरडेल?

**आ०**— होय तेहि एकमेकाला ट्रोत्र ट्रोत्र, डरावडराव, करून बोलतात. फ्रान्स देशाच्या दक्षिणेस कित्येक लहान आणि सुंदर बेडूक आहेत ते चिवचीव असा शब्द करितात.

**रा०**— त्यांचे डरावडराव करणें मला ठाऊक आहे, कां कीं मी तें संध्याकाळीं ऐकत असतों. आई ही गोष्ट तुला ठाऊक आहे? ह्मणतात कीं फ्रान्स देशांत प्राचीन काळीं कोणी आमलदार बागेंत राहावयास गेला ह्मणजे तेथच्या गरीब बिचाऱ्या गावकरी लोकांस ठिकाणीं ठिकाणीं तळ्यांतले बेडूक चूप ठेवण्याकरितां पा-ण्यावर बडगे मारीत सारी रात्र जागत बसावें लागे.

**आ०**— होय, माझ्या लाडक्या, तें तसेंच आहे, एकाद्याला सवड सांपडली म्हणजे कोणाला पाहवणार नाहीं इतका तो दुसऱ्यावर जुलूम करूं लागतो. परंतु चला आपणास आतां लवकर घरीं गेलें पाहिजे.

वाटेंत एक कडा तुटलेला होता, तेथें पूर्वी वाटसरू लोकांस जातां येतां मोठीं अरिष्टें प्राप्त होत म्हणून तो चुकवून जाण्याकरितां एक विशाळ खडक फोडून नवा मार्ग पाडला होता. त्या मार्गानें तीं परत येतांना दोहों बाजूंस शोभायमान वनपुष्पांच्या भरगच्चींतून जे पाझर चालले होते त्यांचे थेंब खालच्या मोठ्या झऱ्यांत मंद स्वरानें पडत होते. हा स्वर राबट याच्या कानीं पडतांच तो म्हणाला, ऐक आई, पाण्यांच्या थेंबाचा असा उत्कृष्ट आवाज येतो हें मला ठाऊक नव्हतें.

**आ०**— आषाढाच्या महिन्यांत आपल्या खिडक्यांवर पावसाचे थेंब पटपट करून पडत असतात त्यापेक्षां या थेंबांची अशा रम्य ठिकाणीं आणि तेजस्वी उन्हांत अधिक मौज वाटती, मुला.

**रा०**—खरेंच, आहा! आई, एथें एक पाण्याचा धबधबा आहे, कृपा करून माझ्या साठीं या पुलावर क्षणभर थांबसील?

**आ०**— डोंगरांत पाण्याच्या धबधब्याचा आवाज खुबच घुमतो, परंतु मुला अमेरिका खंडांत नैयागर नदींत पाण्याचा एक मोठा धोत आहे त्याच्याजवळ गेलें तर त्याच्या गर्जनेनें कानटाळी बसून जातात; ही गर्जना पंधरा कोस ऐकूं येती.

**रा०**— हो! हो! तर तो पराकाष्ठेचाच मोठा असेल आई!

**आ०**— आपण समुद्रकाठीं गेलों होतों तेथें तूं समुद्राची गर्जना ऐकिलीस.

**रा०**— होय, समुद्र निवांत असतो तेव्हां तो ऐकावयाची मोठी मौज आहे, परंतु तुफानांत जेव्हां त्याची गर्जना म्या ऐकिली तेव्हां मला असें झालें कीं हा केव्हां शांत होईल आणि माझ्या कानांस चैन पडेल.

**आ०**— आहा! तर मग गरीब बिचाऱ्या नावाड्यानी काय

करावें बरें, त्यांचें सर्वांग थकलेलें असतें, त्यांस विश्रांति व्हावी व आपलीं तारवें आणि जिव वांचावे ह्मणून ते तुफानांत समुद्र शांत होण्याची किती इच्छा करीत असतील! राबट, म्या तुला सांगितलें आहे कीं आपण जेव्हां तेव्हां तुफानानें नुकसानी होती ती मात्र लक्षांत आणीत असतों परंतु त्यावरून तुफान केवळ निरुपयोगी आहे असें समजूं नये.



रा०— तुफानाच्या वाऱ्यानें ईश्वराचें ह्मणणें सिद्ध झालें याविषयीं जें कांहीं तूं मला सांगितलेंस त्याची मला बरीच आठवण आहे, तें मी सारें विसरलों नाहीं.

आ०— ऐस्बर्ग नामें जीं बर्फाचीं मोठालीं ढेपें पाण्यावर तरतात तीं एकमेकांवर आपटलीं तर त्यांचाहि भयंकर आवाज होत असतो.

रा०— पण आई, आवलांचेज् जीं बर्फाचीं ढेपें घरें आणि मनुष्यें गाडून टाकतात त्या वेळेस त्यांचा कांहीं आवाज होतो किंवा तीं मुकाट्यानेंच पडतात.

आ०— मला वाटतें तीं किंचित गडगडूं लागतात; परंतु डोंगरी देशांत असे प्रतिध्वनि हमेश घुमत असतात. यास्तव ह्या

गडगडण्याकडे तेथचे गावकरी लोक फारसें लक्ष देत नाहींत, मग ते असे बेसावध असतां कधीं कधीं हीं ढेपें अकस्मात त्यांवर पडून त्यांखालीं ते दडपून मरण पावतात.

**रा०**— आहा! किती भयंकर हें! पण आई प्रतिध्वनि ह्मणजे काय?

**आ०**— मुला! वायुचें आंदोलन झालें ह्मणजे ध्वनी होतो तो तुला ठाऊक आहेना, हाच ध्वनी जेव्हां एकाद्या उंच इमारतींसीं किंवा डोंगरासीं अडखळल्यानें जो दुसरा ध्वनी ऐकूं ऐतो त्याला प्रतिध्वनी ह्मणतात. मग तो प्रतिध्वनी जसजसा फांकतो तसतसा हळू हळू ऐकूं येतो.

**रा०**— तर याच कारणावरून मला वाटतें, सकाळीं संध्याकाळीं तोफेचा आवाज राहून राहून ऐकूं येतो.

**आ०**— होय त्याच कारणानें; तसाच मनुष्यानें एकाद्या ठिकाणीं स्वर काढिला असतां त्याचाहि प्रतिध्वनि निघतो.

**रा०**— आई, मी तुझा तो मोठा शंख कानाजवळ धरला ह्मणजे त्यांत समुद्रासारिखें घोंगावूं लागतें, त्या वेळीं मला समुद्राचा किनारा व तेथचे सुंदर खडप झाडें इत्यादिकांची आठवण होती.

**आ०**— होय, शंखाची आकृतीच तसी आहे कीं जरा वाऱ्याचें आंदोलन झालें ह्मणजे त्यांत तसा ध्वनी उत्पन्न होतो.

**रा०**— आई, झाडांचीं पानें पाहा, कसीं खळखळतात! जरीं तीं हळू हललीं तरीं त्यांत किती मौज आहे.

**आ०**— बाबा, उन्हाळ्यांत सकाळच्या वेळीं मंद आणि मनोरंजक असे नाना प्रकारचे नाद निघत असतात; नवे धान्याला वारा जेव्हां इकडे तिकडे झुलवितो तेव्हां तेंहि कसा झुणझुण शब्द करितें, आणि पक्क होतें तेव्हां त्याचा कसा एक चमत्कारिक आणि मंजूळ नाद येतो!

**रा०**— खरेंच आई, ह्या गोष्टीकडे म्या पूर्वीं कधींच लक्ष दिल्हें नव्हतें; आतां मला वाटतें कीं, मी बाहेर फिरायास गेलें तर कांहीं तरीं ऐकल्यावांचून येत जाणार नाहीं.

**आ०**— माझ्या प्रिय मुला, वाऱ्याने झाडांचीं पानें हालूं लागलीं ह्मणजे कित्येक पुरुष त्यांचा नाद ऐकून अमुकच झाडांचीं पानें हालत आहेत असें सांगतात. ताडाच्या झावळ्या हालूं लागल्या ह्मणजे त्यांचा खडखडाट होतो; चिंच खवळलेल्या समुद्राच्या किनाऱ्यासारिखी उसासूं लागती; आणि सरु सरसर करितो, याप्रमाणें झाडांचेंहि स्वर निरनिराळे निघतात.



**रा०**— निःसंशय आई, वाऱ्यांत तरी एक प्रकारचा स्वर असावा, कां कीं तो कधीं कधीं जनावराप्रमाणें हंबरतो.

**आ०**— होय मुला, तो कधीं शेउळ, विलाप, किंवा गर्जना यांसारिखा वाजतो ह्मणून तर तुफानाचा आवाज ऐकून लोक भिऊं लागतात.

रा०— पण आई या सर्व ध्वनींपेक्षां जो मोठा गडगडाट त्याविषयीं आपण कांहींच बोललों नाहीं.

आ०— आहा! एका यहूदी कवीनें त्यास परम उंच ईश्वराचा स्वर असें ह्मटलें आहे, आणि तें योग्य आहे मुला, कां कीं तो गंभीर गडगडाट एका ढगांतून दुसऱ्या ढगांत ध्वनि करीत करीत कसा जात असतो बरें!

रा०— जेव्हां एकादी वीज कडाडून आपल्या डोईवर चमकती आणि घर व जमीन हालविल्यासारिखें करिती तेव्हां किती भयंकर दिसतें आई!

आ०— धरणीकंप होण्याच्या वेळीं जो नाद होतो तो, मला वाटतें, यापेक्षांहि भयंकर असतो.

रा०— धरणीकंपाचा पूर्वी नाद निघत असतो हें मला ठाऊक नव्हतें आई.

आ०— निघतो मुला, पुष्कळ मनुष्यानी तो नाद ऐकला आहे. ज्वालामुखी पर्वत फुटण्याच्या पूर्वींहि असाच भयंकर ध्वनी उठतो. तेव्हां मनुष्यें व जनावरें भयाभित होतात आणि कोठें पळून जावें हें त्यांस अगदींच सुचत नाहीं, कां कीं जर तीं एकाद्या वाटेनें जाऊं लागलीं तर न जाणो पर्वतांताल वितळलेला रस त्याच वाटेवर पडेल किंवा त्याच जागीं जमीन फाटून त्या सर्वांस गिळून टाकील याचा नेम नाहीं.

रा०— तर आपण ज्वालामुखी पर्वताजवळ राहिलों नाहीं हें बरें आहे; अणखी पाहा कीं मोठ्या भयंकर गडगडाटापेक्षां धर्मपुस्तकांतील मंजूळ स्वर आपल्या कानीं पडतो ही केवढी आनंदाची गोष्ट आहे आई.

आ०— माझ्या प्रिय मुला, धर्म पुस्तकांतील ईश्वराचा मंजूळ स्वर कानीं पडणें हें एक मोठें भाग्य आहे असें समजा. पाहा! मनुष्यांचा चंचळ स्वभाव पाहून जरी ईश्वर त्यांसीं प्रत्यक्ष बोलत नाहीं तरी त्यानें आपला पुत्र जो येशू त्यास मनुष्याचा अवतार देऊन मध्यस्थ पाठविला आणि त्याकरवी आह्मासीं बोलला, याज-

करितां मुला, जे कोणी ख्रीस्तावर अंतःकरणपूर्वक विश्वास ठेवितील ते या संसारबधनापासून मुक्त होतील.

**रा०**— आई, त्वां मला जें सांगितलें त्यावरून मी तुझा फार उपकारी झालों; आतां बाहेर जाते वेळीं मी आपले कान उघडे ठेवीत जाईन. अरेरे! बहिरे होऊन या गोष्टी कानीं न पडणें ही किती दुःखाची गोष्ट आहे!

**आ०**— माझ्या लाडक्या, मुळींच जे बहिरे आहेत, ज्यांनीं कधीं कांहीं ऐकलें नसतें, त्यांस ही मौज ठाऊकच नाहीं, मग त्यांना खेद कसा वाटेल; परंतु तें इंद्रिय एकदां असून मग नाहींसें झालें तर मात्र दुःखाची गोष्ट आहे.

**रा०**— असें आहे काय? तर मग मी कोणत्याहि बहिऱ्यास कसें वाटतें हें विचारीत जाणार नाहीं.

**आ०**— विचारूं नयेच कां कीं कोणालाहि आपल्या शरीराचें व्यंग सांगायास फार दुःख वाटतें, आणि मुला या विषयावर कांहीं समजून घ्यावयाचें असल्यास कीतो नामक वैद्याने "गत इंद्रिय" ह्मणून ग्रंथ लिहिला आहे तो वाचून पाहा, त्यांत बहिरेपणा प्राप्त झाल्यावर त्याची वृत्ती कसकसी होत गेली याचें त्याने उत्कृष्ट वर्णन केलें आहे, अणखी बहिरेपणा प्राप्त झाला असतां कोणत्या युक्ती योजून काम चालवावें हेंहि त्यांत सांगितलें आहे.

**रा०**— आई, बहिरे लोक स्वर्गांतील सुरस गायन ऐकायास शक्तिमान होतील?

**आ०**— होय माझ्या लाडक्या, पृथ्वीवरील उत्तम गायनापेक्षां स्वर्गींचें अति सुरस जें गायन त्याचा उपभोग त्यांस मिळेल.



# प्रकरण २.

---

वसंतऋतु अथवा प्रकृतीचें चित्रविचित्र स्वरूप.

राबट हा आपल्या बागेंतून बाहेर पडतो आहे तों एकाएकींच वादळ होऊं लागलें ह्मणून तो धांवत धांवत जाऊन बंगल्याच्या पडवीखालीं उभा राहिला, आणि ह्मणतो, "एकच ढग दृष्टीस पडतो तर पाऊस लवकर उघडेल असें वाटतें. पण इतका सडसडावून पडतो हें बरें आहे, तेणेंकरून माझ्या गुलाबाच्या झाडांवर व द्राक्षवेलीवर जे कीटक असतील ते आपसुकच धुपून जातील. अरे! एथें ऊन पडूं लागलें; आहा! तें इंद्रधनुष्य पाहावयास मी दिवानखान्याच्या खिडकींत जातों. इतकें बोलून तो जाऊं लागला.

दिवानखान्याचा खिडकीजवळ येऊन तें तेजस्वी धनुष्य आकाशांत पाहिल्यावर राबट यास मोठें समाधान वाटलें. त्याचे तरतऱ्हेचे रंग पाहत तो तटस्थ उभा राहिला; पावसाची सर जसजशी येई तसतसें तें घटकेंत तेजस्वी, घटकेंत अंधूक होई, असें होत होत शेवटीं तेजस्वी, दिसून वितळून गेलें. नंतर स्वच्छ ऊन पडलें, त्याच्या तेजानें झाडांवर जे पावसाचे टिपके होते त्यांत तरतऱ्हेचे रंग दिसूं लागले.

आई दिवानखान्यांत आल्यावर तो ह्मणाला, आई, हे दिवस किती चांगले आहेत. वर्षाच्या साऱ्या महिन्यांत आश्वीन मला फार आवडतो, कां, तुला कसें वाटतें?

**आ०**— माझ्या मुला, ईश्वरानें सर्व वस्तु त्यांच्या त्यांच्या हंगामांत चांगल्या करून ठेविल्या आहेत. आणि प्रत्येक घडीचेंहि सुख वेगळालें लावून दिल्हें आहे.

**रा०**— आई, हवेविषयीं ह्मणसील तर तें वास्तविक आहे, कां कीं बाहेर तुफान होतें तें पाहिलें ह्मणजे आपल्याला घरांतील सुख

अधिक चांगलें वाटूं लागतें; पण मला जेव्हां त्रास उत्पन्न होतो तेव्हां सारें उदास दिसतें, याचें काय कारण?

**आ०**— आपण कांहीं वाईट केलें असलें तर आपलें मन आपणांस खातें; पण असो, ईश्वरानें पाठविलेलें दुःख जर तुला भारी वाटतें तर त्याचें कारण हेंच समज कीं तुला दिल्हेल्या सुखाकडे तुझे डोळे उघडे नाहींत, कां कीं मुला, कसेंहि दुःख असो त्याचें निवारण करायास ईश्वर शक्तिमान आहे; तो दुःखी मनुष्यास अशा प्रकारें धीर देईल कीं, त्याला दुःख भारी न वाटतां उलटें सुख होईल.

**रा०**— आई, जर माझें मन दुःखी झालें, तर तें पुनः सुखी कसें करावें, तें मला कृपाकरून शिकीव.

**आ०**— माझ्या प्रिय मुला, जर तुझा ईश्वरावर पूर्ण भरंवसा आहे तर जे कांहीं घडून येईल व जे चमत्कार तुझ्या दृष्टीस पडतील त्या सर्वांचें कौतुक पाहून तुला आनंदच वाटेल; कधीं दुःख वाटणार नाहीं.

**रा०**— ठीक, मनुष्याच्या उपयोगी जें धान्य इत्यादिक यांस ऋतूचे फेरफार किती अवश्यक आहेत हें मला समजाविलेंस त्यापासून जसे ते मला बरें वाटूं लागले तसेंच हें आहे.

**आ०**— होय तसेंच; आपण एकच तऱ्हा पाहत जावी किंवा आयुष्यभर एकच काम करीत असावें त्यापेक्षां निरनिराळ्या प्रकारानें आपलें मनोरंजन करावें असा ईश्वरी संकेत दिसतो.

**रा०**— खरेंच, प्रवासास जाऊन नवे नवे देश आणि लोक पाहावे यांत केवढी मौज आहे आई!

**आ०**— फारच मौज आहे मुला; परंतु प्रवासास जाणें बहुतकरून सर्वांसच अनुकूळ असत नाहीं; आतां आपल्याला जो चित्रविचित्रपणा पाहावयाचा तो आपलें शेजार न सोडितांच पाहूं. याह्या खिडकींतून ती जागा पाहा. जरी ती मोठी विस्तीर्ण नाहीं तरी मला जें सांगायाचें आहे त्याकरितां ती सोयकर आहे.

**रा०**— आई, तर मग मला पाहूं दे. आहा! पहिल्यानें तर आपलाच लहान बाग दृष्टीस पडतो.

**आ०**— बरें, तीच पाहा, तुला जनावराची व वनस्पतीची रचना किती प्रकारची दिसेल ती.

**रा०**— आई, मी निरनिराळ्या आकृतीच्या पुष्पांच्या कळ्या फार पाहतों, त्यांविषयीं माझ्या पुस्तकांत असें सांगितलें आहे कीं त्यांचे उमलण्याचे प्रकार बहुतकरून निरनिराळे आहेत.

**आ०**— खरेंच आणि त्या जेव्हां अगदीं उमलतात तेव्हां त्यांचा चित्रविचित्रपणा किती अपार व सुंदर दिसतो. एका झाडावर जरी अवघा सारिखेपणा दिसतो तरी त्याच झाडाचीं कोणतींहि दोन पानें तोडून पाहा तीं एकसारिखीं दिसणार नाहींत.

**रा०**— आहा! आई असें आहे काय?

**आ०**— होय, मुला; आतां पाऊस उघडला आहे. म्या जें तुला सांगितलें त्याचा प्रत्यय पाहावयाचा असला तर जा, मुठभर तर्जीचीं व गुलाबाचीं पानें घेऊन ये.

राबट तीं आणायास जातांजातां मनांत ह्मणतो कीं ही गोष्ट तर अगदी संभवण्याजोगी दिसत नाहीं, आणि आई कधीं खोटें सांगत नाहीं, तर हें मोठें आश्चर्य आहे. असें ह्मणून त्यानें झाडावर नीट लक्ष लावून जीं पानें एकासारखीं दिसलीं तींच निवडून निवडून तोडिलीं. आणि दिवानखान्यांत आणून मेजावर पसरलीं, नंतर त्यांतून एकेकाला जोडी पाहूं लागला परंतु ती त्यास सांपडली नाहीं; तर्जीच्या पानावरील खुणा आणि गुलाबाचे पानाची आकृती हीं फारच शोभायमान होतीं खरीं, पण त्यांची साम्यता एकमेकांसी अगदींच झाली नाहीं.

**रा०**— आई, तीं खरींच, भिन्न पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें, पाहा प्रत्येक पान त्याच्या जातीच्या पानासारिखें दिसतें तथापि त्यांतून एकाच्या जोडीस दुसरें पाहावें तें अगदीं मिळत नाहीं.

**आ०**— मुला, मी तुझ्या वयाचीं होतें तेव्हां सब्जा आणि वर्त्तल्याचीं पानें सारखीं मिळवून पाहण्याकरितां पुष्कळ वेळ घालविला परंतु एकदांहि दोन पानें सारखीं दिसलीं असें मला आठवत नाहीं.

**रा०**— बये, सर्व वस्तु अशाच भिन्न असतात, काय? चारीचीं पानें आणि आपल्या पाहण्यांतलीं सुंदर फुलें हींहि असींच असतात?

**आ०**— होय माझ्या बा, अगदी एकासारिखे असे कोणतेहि दोन प्राणी सांपडणार नाहींत. रानांतलीं फुलेंच मुठभर घेऊन पाहा. त्यांची आकृती, वास, रंग आणि उपयोग हे केवळ निराळे दिसतील.



अमर वेल.

**रा०**— होय खरेंच, गतवर्षी उन्हाळ्यांत तूं परोपरीच्या वनस्पती मिळवून झेला केला होतास तो काय पण सुंदर दिसत होता!

**आ०**— मुला, अलिकडे नव्यानव्या वनस्पतीचा शोध लागला आहे. असो, त्यांतलीच केवळ प्रसिद्ध असी शेवंती व निवडुंग हीं घेऊन त्यांचा पाहिजे तर भेद पाहा.

**रा०**— आई, तीं तर अगदीं भिन्न दिसतात; शेवंती किती

सरळ व नाजूक आहे? आणि निवडुंग वांकडे तिकडे आणि त्याला कांटे किती आहेत पाहा!

आ०— पण राबट ह्याच वांकड्या तिकड्या आकृतीच्या निवडुंगास मोहोर येतो. तो किती सुंदर आहे! तसेंच कोरकांडे व बहवरी यांच्या आकृतींत व स्थितींत किती वेगळेपणा आहे!

रा०— आई, अमरवेल आणि गुळवेल हींहि गुलछबु आणि गुलबास यांहून फार भिन्न आहेत.

आ०— होय माझ्या मुला, तुझी चुलती मेरी इने आह्मास शेरावर रुजणारी व त्याच्या सर्वांगास वेटाळे घालणारी एक पिवळी अमरवेल पाठविली आहे. ती ताठर चिंचेहून फारच वेगळी दिसवी.

रा०— आई, अरण्यांत तरतऱ्हेचीं झाडें असतील ना?

आ०— होय, साग, माड, ताड, पिंपळ इत्यादि परोपरीचीं झाडें असतात.

रा०— आणि या सर्वांला फळें आणि मोहोर निरनिराळ्या प्रकारचे येत असतील ना?

आ०— होय, भाजीवाल्याच्या दुकानांत जा ह्मणजे तुला पुष्कळ प्रकारचीं फुलें व भाज्या पाहायाला सांपडतील आणि परमुलखाचीं पाहावयाचीं असल्यास त्यांचीं चित्रें पाहा ह्मणजे याहूनहि अधिक प्रकार दृष्टीस पडतील.

रा०— आई, त्या दिवसीं तूं मला अमेरिका देशांतील पुष्कळ फळांचीं चित्रें दाखविलीं होतीस.

आ०— दुसऱ्या देशांत नाना तऱ्हेचें उत्पन्न आहे आणि तें बहुत प्रकारें उपयोगी पडतें; तुला ठाऊक असेलच कीं कित्येक वनस्पतीवर मनुष्यांचा व जनावरांचा निर्वाह चालतो; कित्येक उत्कृष्ट औषधी आहेत, कित्येक जहरी विषें, आणि कांहीं वस्त्र प्रावर्ण किंवा अलंकार करायास देखील उपयोगाच्या आहेत; आणि मुला जसजसा त्याचा कठीणपणा, टिकाउपणा, अथवा सौंदर्य असतें तसतसा मनुष्यानी त्यांचा उपयोग जाणून किंमत ठराविली आहे.

रा०— तर मग सारीं लांकडेंहि एकसारिखीं नाहींत आई?

आ०— नाहींच. त्यांचा रंग अथवा हीर हीं अगदी भिन्न अ-

सतात. सागाचें लांकूड, सिसवी लांकूड, आणि जंगली लांकूड यांचा भेद तूं देखील काढसील. फणस, देवदार, चिंच यांची लांकडें इतर लांकडांपेक्षां भिन्न आहेत. कां, एक दिवस सुतारानी तासून टाकलेल्या धलप्यांत लांकडांचे तुकडे शोधित होतास ना? आणि म्या तुला असें ह्मणतांहि ऐकिलें आहे कीं मला घरांचे व किल्ल्यांचे नमुने करायाचे आहेत ह्मणून चंदनाचे चांगले तुकडे सांपडतील तर बरें होईल.

रा०— खरेंच, त्याची आठवण राहिली नाहीं. आई, मला जंगली लांकडावर चांगलें कोरतां येत नाहीं, आणि सिसवी लांकूड तर माझ्या शस्त्रास फार कठिण पडतें.

आ०— आणि वेळु व बांबु यांच्या जाती इतर झाडांपेक्षां केवळ भिन्न असून टोपल्या व घरांतील दुसऱ्या जिनसा करावयाच्या किती उपयोगी आहेत हें ध्यानांत आण मुला, त्यांच्या बद्दल दुसऱ्या एकाद्या वस्तूचा उपयोग करीन ह्मटलें तर मला सुचत नाहीं.

रा०— आई, वनस्पतीचे किती चमत्कारिक प्रकार आहेत!

आ०— आणि जनावरांचे असेच आहेत; ज्यांस तितका सहवास आहे ते कळपांतल्या एकएक जनावराचें तोंड व आकृतिच्या अनेक खुणा सहज सांगतात.

रा०— आई, जोवेत याने सांगितलेलें खरेंच असेल काय? कीं पालेस्तिन देशांत धनगर आपापलें मेंढे ओळखीत व एकएकास हाक मारून बोलावीत.

आ०— होय मुला, तसें बहुतेक धनगर जे लोंकरीसाठीं मेंढे बाळगितात ते त्यांस कोणत्या तरी नावानें हाक मारितात. असो, जर तूं एकाद्या जनावराचे कळपाकडे नीट लक्ष लावून पाहसील तर तुला देखील पुष्कळ भेद कळेल.

रा०— आई, आपल्याला जर थोडासा भेद दिसतो तर जनावरांस जनावरांचा अधिक दिसत असेल.

आ०— यांत काय संशय? पाहा कीं लहान जनावर आपल्या आईस आंधारांतूनहि शोधून काढतें; तसेच पक्षी एकदां जुळले ह्म-

णजे त्या वर्षी त्यांचा कधींहि विजोड होत नाहीं, मृत्यु आला तरच होईल; अणखी मुला, मधमाशा, भ्रमर कीटक आणि मुंग्या यांच्या घरकुंड्यांत त्यांच्या जातीचा दुसरा कोणी घुसला तर त्याला हांकून लावितात.

**रा०**— आई, स्थूल आंगाच्या हत्तीपासून तर लहान सुंदर गुंगणाऱ्या पक्ष्यापर्यंत जनावरांत किती निरनिराळ्या आकृती आहेत बरें?

**आ०**— जर मासे किर्डी आणि कीटक हेहि यांत धरसील, तर मग त्यांच्या आकृतीला पारच नाहीं.

**रा०**— होय खरेंच पण सध्या इतक्याच विषयीं विचार करूं दे. देवमासे व आकाशांत गमन करणारे पक्षी; उंट व समुद्रांतील घोडे; गोगलगाया आणि तितूर; यांशिवाय टोळ, नाकतोडे, आणि त्या दिवशीं तूं मला चमत्कारिक कीटक दाखविले ते. आहा! ह्या सर्व प्राण्यांच्या निरनिराळ्या प्रकारचें अंतर असेल काय?

**आ०**— असें आहे माझ्या लाडक्या, आणि त्यांच्या राहावयाचे प्रकार समजणें हें तरी मोठें उपयोगी आहे; पाहा कित्येकांस भयंकर गुहेंत, कित्येकांस उंच झाडांवर, आणि कित्येकांस समुद्रांत राहावयास आवडतें.

**रा०**— आई, जनावराने जेथें आपल्याला सुखावह घर बांधलें नाहीं असी कोणतीहि जागा नसेल असें मला वाटतें.

**आ०**— वास्तविक, मुला; आणि त्यांच्या घराच्या आकृती व तीं बांधायास काय काय जिन्नस लागतात याचाहि पार नाहीं. पाहा, सुतेऱ्याच्या जाळ्याचे तंतु तरी किती बारीक असतात; तसेंच बिवर जनावराचें घर किती पराकाष्ठेच्या मेहनतीने बांधलेलें असतें.

**रा०**— आई, मधमाशीचे पोळें कावळ्याच्या घरकुंड्यासारिखें असेल ह्मणावें तर त्यांत देखील भेद दिसतो.

**आ०**— त्याचप्रमाणें सुतेऱ्यांची आंडीं घालायाची रेशमासारिखी पिशवी आणि किडे व बेडूक यांचीं तळ्याच्या काठीं बांधलेलीं बिळें यांत तरी केवढें अंतर दिसतें, मुला!

**रा०**— आई, आजोबाच्या पेटींत एक झाडाची डाहाळी त्या

पाहिली तिला पांढरासा चमत्कारिक गोळा चिकटला होता तो क-शाचा बरें?

आ०— मुला, तो गांधिणीचा घरकुंडा. त्याच्या आंतल्या बाजूस मधीच्या पोळ्या सारिखीं सर्व छिद्रें आहेत. अणखी या देशांत एक सुगरण नावाचा चमत्कारिक पक्षी आहे तो झाडाचीं लोंबतीं पानें एकासीं एक शिवून त्यांवर आपलें कोटें बांधीत असतो.

रा०— आई, लहान पक्षी आपल्या लोंबत्या कोटयांतून डोकावून पाहतात ती तरी मोठी मौज आहे.



कांचेच्या भांड्यांत मधमाशीच्या पोळ्याची रचना.

आ०— असले चमत्कार जंगलांत फार असतात मुला; तेथें पक्ष्यांचे व फुलपांखराचे पंख किती शोभायमान दिसतात! आणि संध्याकाळच्या वेळेस चिमुकले काजवे दिव्याप्रमाणें किती चमकत असतात.

रा०— आई, मला वाटतें, परदेशांतले लोकहि भिन्न भिन्न दिसत असतील.

आ०— होय यांत काय संशय, प्रवास करून आलेले पुष्कळ लोक सांगतात कीं मनुष्याचें रूप, वर्ण, व रीति भाति हीं त्या त्या देशांत निरनिराळीं आहेत.

रा०— आहा! आई, कांहीं लोक काळे व कांहीं गोरे आहेत.

आ०— अणखी कित्येक ताम्र वर्णाचे, कित्येक पोवळ्याचे रंगाचे, व कित्येक काळसर असेहि आहेत; आणि मुला, सर्व पृथ्वीवर प्रवास करून पाहिलें तर कांहीं तपकिरी व बदामी अशा तरतऱ्हेच्या रंगाचीं मनुष्यें दृष्टीस पडतील.

रा०— बरें, कोणी चुकून एकादा मनुष्यालाच जनावर करील असें तर घडणार नाहीं ना?

आ०— आहा! तसें कसें घडेल? मनुष्य कितीहि रानटी व नीच स्थितींत असला तरी तो सर्व श्वापदांचा प्रभु असें त्याच्या आंगीं तेज असतें; आणि माणसाची वाढ व तोंडवळा यांतहि विशेष फेरफार दृष्टीस पडतो.



सुगरण पक्ष्याचें कोंटें.

रा०— थंड देशांतले लोक उत्तर अमेरिकेंतल्या एस्कीमो लोकांसारिखे ठेंगणे आणि जाडे असतात काय?

आ०— होय, तेथें थंडीचा कहर असतो ह्मणून त्यांचीं शरीरें टणकच असलीं पाहिजेत; उष्ण देशांत मनुष्याचा वाढा उंच होत

जाती व आंग सडक असतें, तेणेंकरून थंड देशांतल्या लोकांप्रमाणें काम करण्याची शक्ति त्यांला नसती.

रा०— आई, ह्या हिंदुस्थानांतलींहि मनुष्यें एकसारिखी दिसत नाहींत.

आ०— नाहींच दिसायाचीं मुला, निरानराळ्या लोकांच्या तोंडवळ्यांत भेद आहे. हें तर असो पण एका जातींत एकाच्या स्वरूपासारिखें, दुसऱ्याचें पाहूं गेलें तर देखील सांपडणार नाहीं. तशांत या देशांत तर शेंकडों प्रकारचे लोक मिसळले आहेत.

रा०— खरेंच, एकाद्या आळींत किंवा मेळ्यांत लोकांकडे नीट लक्ष लावून पाहिलें ह्मणजे हा भेद आपल्या ध्यानांत येतो.

आ०— भेद तर उघड दिसतो, परंतु तो कशानें होतो हें सांगणें कठीण.

रा०— आई, सर्व मनुष्यें एकमेकांसारिखी दिसूं लागलीं तर तेंहि फार वाईटच.

आ०— होय आणि तसें झाल्यास आपल्याला आपलीं सोयरीं धायरीं देखील ओळखायास फार अवघड पडेल. पाहा एकाच मनुष्यामध्यें बाळपणापासून ह्मातारपणापर्यंत केवढे चमत्कारिक फेरफार होतात ते; आणि तो सुशिक्षितपणें वाढला तर त्याचें बाळपण तारुण्य आणि वृद्धपण हीं प्रत्येक त्यास किती सुखाचीं जातात बरें!

रा०— खरेंच आई, जेव्हां मी जुलिया एवढा होतों तेव्हां मी जे जे खेळ खेळलों त्याचा विचार करूं लागलों तर आतां मी एक नवाच मनुष्य आहें, असें मला वाटतें.

आ०— माझ्या लाडक्या, बर तूं माझ्या अथवा तुझ्या आजीच्या वयाचा होईपर्यंत वाचसील तर जसजसें तुझें वय होत जाईल तसतशा तुझ्या वृत्ती पालटतील आणि तुला नवीं नवीं कामें करावीं लागतील व तितकी काळजीहि बाळगावी लागेल.

रा०— आई, धर्मपुस्तकांतहि असेंच सांगितलें आहे कीं, "जेव्हां मी मूल होतों तेव्हां मुलासारिखा बोललों, मुलासारिखा

समजलों, मुलासारिखा विचार केला, परंतु मोठा मनुष्य झालों तेव्हां बाळपणाच्या वस्तु सोडून दिल्या."

**आ०**— होय तसेंच मुला. पाहा, आपण कधीं अनुभविला नाहीं असा जो हा संसार यांत मार्ग दाखविणारा एकादा मित्र सांपडला तर आपण किती सुखी होऊं !" हा मनुष्यजन्म एकदां प्राप्त होतो यांत जर आपण अपराध करून पाप केलें तर मग किती भयंकर परिणाम होईल !

**रा०**— आई, हें माझ्या लक्षांत आलेंच नव्हतें. पण ही मोठी अगत्याची गोष्ट आहे कीं आपणास कर्तव्य काय हें आपण निरंतर चिंतीत असावें.

**आ०**— फारच अगत्याची आहे कां कीं आळसी मनुष्यास ईश्वरानें ह्मटलें, "तूं सारा दिवस एथें उगीच कां उभा राहिला आहेस, जा माझ्या द्राक्षक्षेत्रांत काम कर."

**रा०**— ईश्वरासाठीं सर्वांनीहि कांहीं काम केलें पाहिजे काय? लहान मुलानीहि?

**आ०**— निःसंशय, धर्मपुस्तकांत सांगितलें आहे कीं ख्रीस्ताचें देवालय पूर्ण व अखंड दिसण्याकरितां जर त्याचा एकादा सांदा ढळला असला तर तो नीट करा. कोणताहि ख्रिस्ती असो त्यास आपली कसीहि बुद्धि असली तरी वाढविली पाहिजे. जर न वाढवील तर तो दोषी होईल, आणि जर मनोभावेंकरून वाढवूं लागेल तर ईश्वर त्यास अधिक ज्ञान देईल.

**रा०**— आई, मी आपली बुद्धि कसी वाढवावी हें मला कृपाकरून शिकीव.

**आ०**— माझ्या लाडक्या, तुला जी संधी सांपडेल ती तूं विद्याभ्यासांत घालीव; आणि ईश्वराच्या सेवेंत सादर होईन, असें ईश्वराजवळ मागत जा.

**रा०**— आई, आतां पाऊस गेला. पाहा ओली रेती उन्हानें कसी चकाकती! आणि तेथें धोंडेहि किती निरनिराळे रंगाचे दिसतात?

**आ०**— राबट, आतां तुझें लक्ष धोंड्याकडे गेलें वाटतें. बरें,

तुझी खुषी असली तर जा; टोपली घेऊन ये; आपण खाणी पाहवयास जाऊं. तेथून तुझ्या गुंफेंत ठेवण्याकरितां कांहीं अधिक वस्तू घेऊन येऊं.

रा०— वा! फार चांगलें आई! असें ह्मणून हा लहान मुलगा खुशाल झाला आणि फिरावयास जाण्याची तयारी करण्याकरितां धांवत गेला.

जेथें हीं राहत असत त्या स्थळाच्या आसंमतात गारीच्या संगमवरी दगडाच्या, स्फटिकाच्या आणि सिलेटीच्या मोठाल्या खाणी होत्या; तेथें राबट याला आपल्या आईबरोबर जाऊन तऱ्हेचे खडकांचे नमुने मिळवून त्यांचा संग्रह करण्याचा फार छंद असे.



सिलेटीची खाण.

त्यानें चमत्कारिक सिद्ध पदार्थांचा शोध करावा ह्मणून त्याची आई त्याला नेहमी उत्तेजन देत असे, आणि ज्या कोणत्या गोष्टीविषयीं किंवा पदार्थाविषयीं हा पृच्छा करी त्या सर्व ती मोठ्या आनंदानें समजावून देई. आतां अमुक विषय मला आवडला आणि अमुक आवडला नाहीं हें स्पष्ट सांगण्याजोगतें राबट याचें वय नव्हतें, परंतु त्याच्या आईस त्याचें कोड पुरवून देण्याला व

पुढें तो जी विद्या शिकूं लागेल ती किती अपार आहे हें सांगायाला ती फार उत्सुक असे. हा लहान मुलगा तिच्या बरोबर मौज पाहत चालला असतां मनांत विचार करी कीं हळुहळु माझी बुद्धि वाढून मी पुढें मोठमोठे विषय शिकेन, मग मोठा झाल्यावर त्यापासून मला फार लाभ होईल. असीं तीं जातां जातां एका सिलेटीच्या खाणीकडे मार्ग रोखून चाललीं.

एका उंच टेंकडीवर चढल्यावर हा लहान मुलगा मोठ्यानें गर्जून ह्मणाला, आहा! आई एथून समोर एक सरोवर दिसत आहे व ह्या आसपास किती टेंकड्या आहेत, आणि ती सुंदर लहान नदी त्या हिरव्या झाडांतून वाहत चालली आहे ती तरी किती मौजेची दिसत आहे!

**आ०**— होय मुला, नुसत्या रेतीच्या मैदानापेक्षां किंवा उजाड रान अथवा अपार अस्मानी रंगाचा समुद्र यांपेक्षां ही मौज फारच आहे.

**रा०**— आई, याशिवाय दुसरी कांहीं मौज नसली तर इचाहि मला लवकरच कंटाळा येईल ना?

**आ०**— येईलच मुला, आणि यावरूनच पाहा कीं डोंगर, शेतें, जमीनी यांची मौज दिसावी ह्मणून चित्रविचित्रपणा किती अवश्य आहे तो, आणि विशेषेंकरून जेव्हां ढग येतात तेव्हां सकाळीं किंवा संध्याकाळीं आकाशांत निरनिराळे प्रकारचे रंग होऊन सर्व विश्व किती शोभायमान होत असतें बरें!

**रा०**— आई, आकाशाकडे पाहून मला वारंवार संतोष वाटतो; आतां ढगांकडेस पाहा त्यांचा आकार कसा निरनिराळा आहे. त्यांतले कांहीं दाट काळे दिसतात आणि कांहीं पांढरे पातळ आहेत, त्यांवर गुलाबी व तांबडे रंगाची छाया आहे, आणि कांहीं डोंगराच्या किनाऱ्यावर आहेत ते बर्फाच्या योगानें शुद्ध सोन्यासारिखे चकाकतात.

**आ०**— राबट, तेथें इंद्रधनुष्याहि आहे; पाहा, उन्हाळ्याच्या दिवसांत आकाश नुसतें स्वच्छ असून अस्मानी रंगानेंच शोभिवंत दिसतें असें नाहीं पण ढगामुळेंहि फार सुंदर दिसतें.

काल संध्याकाळीं सूर्य अस्तास जातांना किती तेजस्वी दिसला आणि प्रातःकाळीं त्याचीं किर्णे वर येतांना पाहण्याची तरी केवढी मौज आहे.

रा०— आई, कधीं कधीं रात्रीला शोभायमान करणारें सुंदर चांदणेंहि किती रमणीक दिसतें बरें?

आ०— तशा तेजस्वी चांदण्याहि दिसतात; त्यांच्या निरनिराळ्या रंगावरून सिद्ध होतें कीं एका चांदणीचें तेज दुसरीच्या तेजाहून भिन्न आहे.

रा०— आहा! आई पावसाचे थेंब केवढे मोठे पडूं लागले आतां आपण कसें करावें?

आ०— जिला तूं दगडाची खोली ह्मणतोस त्या मोठ्या गुहेच्या आश्रयास आपण जाऊं. या खडपाळ रस्त्यावरून चला ह्मणजे तेथें लवकर पोहंचूं. माझा हात धर हो, नाहीं तर तुझा पाय सरेल.

पावसाची सर आल्याच्या पूर्वींच तीं हात पाय टेकीत टेकीत ती खोल उतरण उतरून आश्रयाखालीं उभीं राहिलीं. राबट हा तेथें फार दिवस गेला नव्हता ह्मणून इकडे तिकडे पाहून ह्मणतो,—

रा०— आई त्या भिंतीला किती प्रकारचे रंग आहेत. मागें आपण एथें आलों होतों खरें, पण तेव्हां जें कांहीं पाहिलें त्यांत आतां पुष्कळ फेर दिसतो.

आ०— मला तर कांहीं फेर दिसत नाहीं मुला. कदाचित मागें तूं या चमत्काराकडे बरोबर लक्ष दिल्हें नससील.

रा०— खरेंच आई, तांबड्या रंगाच्या भिंती, काभरे रंगाची जमीन, आणि हिरव्या रंगाचें छप्पर व त्यावर जिकडे तिकडे शुभ्र पांढरे रंगाच्या शिरा, वा! उत्कृष्ट चमत्कार हा!

आ०— होय बाबा, या संगमरवरी जातीच्या दगडांत अन्य पदार्थांची भेळ झाली ह्मणजे तो फार चमत्कारिक दिसतो.

रा०— आई, ह्यांतून प्रत्येक जातीच्या दगडाचा कांहीं मासला

माझ्या गुंफेंत ठेविला पाहिजे, आणि थोडिसी काळी सिलेटहि घ्यावी ह्मणजे ती एक तऱ्हा होईल, नाहीं बरें?

**आ०**— तीहि चांगली तऱ्हा आहे; परंतु मला पुढें एक मोठा ढीग दिसतो कदाचित त्यांत जांबा दगड सांपडेल.

**रा०**— (हर्षानें ह्मणतो) चला तर मग तो चमत्कारिक दगड पाहूं. आई, हा जांबा दगड पाहा, किती प्रकारचा आहे! काळा, तांबडा, काभरा, पांढरा, गुलाबी. (एक चकचकीत असा अभ्रकानें भरलेला तुकडा हातीं घेऊन ह्मणतो) हें काय आई?



दगडाची खाण.

**आ०**— मुला, तोहि एका प्रकारचा जांबा दगड आहे, परंतु एवढा अभ्रक तुला दुसऱ्या कोणत्याहि पदार्थावर दिसणार नाहीं. एथें एक तुकडा आहे त्यांत कित्येक पदार्थांची भेळ झाली आहे ह्मणून त्याला चिकीचा दगड ह्मणतात.

**रा०**— हें नांव चमत्कारिकच आहे! मी धान्य इत्यादि दग-

डासारिखें कठीण झालेलें पाहिलें आहे. आई, हा तांबा दगड तुझ्या जवळच्या खनिज पदार्थांतीलच एक दिसतो.

आ०— तो तुझ्या गुंफेंत ठेवसील तर फार शोभा देईल. पर्वत आणि टेंकड्या यांत जसजसे पदार्थ असतात तसतशा त्या उंच नीच सरळ खोल अशा होत जातात; ज्यांत खडू आहे अशा डोंगराच्या बाजू उतरत्या असतात आणि ज्यांत चुन्याचे किंवा जांबे दगड असतात ते उंचनीच होतात. हे चमत्कार तूं कधीं प्रवासास गेलास तर पाहसील.

रा०— होय, ते पाहून मी ध्यानांत ठेवीन.

आ०— तसीच त्यांच्या सपाटीवर चिकणी माती भुरभुरीत रेती व तरवऱ्हेच्या जातीची माती असते.

रा०— कां, आई मला वाटतें, निरनिराळे प्रकार जितके वर दिसतात तितके आंतहि असतील ना?

आ०— होय, अझून पुष्कळ प्रकार सांगायाचे आहेत, सर्वच संपले असें नाहीं. मुला त्या दिवसीं आपण निरनिराळ्या प्रकारच्या संगमरवरी दगडांचे मेज पाहिले त्याची तुला आठवण आहे काय?

रा०— होय आहे, ते प्रकार किती असतील ह्मणून आपण मोजीत होतों इतक्यांत बाबाने मला हाक मारिली.

आ०— अणखी धातु व कच्चे धातु यांचे प्रकार ध्यानांत धरले आहेस काय?

रा०— होय, ते बर धरले तर आपल्या संग्रहांत वीस किंवा तीस यांहून अधिक तऱ्हा होतील आणि तुझ्या जवळ कच्चे तांब्याचे जितके नमुने आहेत तितकेच बर एकएका धातुचे असले तर अबब! आपला संग्रह केवढा मोठा होईल!

आ०— माझ्या प्रिय मुला, एकएक धातु इतक्या पदार्थांबरोबर मिश्रित झाला असतो कीं तेवढ्याचे नमुने मजजवळ सांपडणें कठीण. हें एक तूं ध्यानांत ठेव कीं धातु किंवा कोणताहि पदार्थ अन्य पदार्थासीं मिश्रित झाला तर त्याचे गुणदोष अगदी पालटून जातात.

**रा०**— आई, जसे सोनें लोखंड यांचे उपयोग निराळे आहेत तसे त्यांचेहि असतील ना?

**आ०**— होय राबट; अणखी खाणीमध्यें बहुतेक रत्नेंहि सांपडतात.

**रा०**— आई, सुंदर हिरे व याकूत हे देखील जमीनींतून खणून काढितात?

**आ०**— होय; दगडी कोळशांत जो जळणारा भाग असतो त्याच्याच खाणीमध्यें हिरा होतो.

**रा०**— आणि आई मोतीं कशाचीं होतात बरें?

**आ०**— मोत्यांची उत्पत्ति लंकेजवळच्या समुद्रांत आणि इराणच्या आखातांत एका जातीच्या कालवापासून होती; परंतु तीं कालवाचा रोग किंवा कसें याविषयीं अझून संशय आहे.

**रा०**— मुक्तास्फोट ह्मणून जें म्या ऐकलें आहे तें, मला वाटतें, शिंपीच्या आंतली बाजू असेल.



सळ्यासळ्याचे शंख.

**आ०**— होय, शिंप्या पाहूं गेलों तरी त्याहि निरनिराळ्या आकृतीच्या दिसतात व त्यांचा सुरेखपणा आणि रंग हे फार चमत्कारिक असून त्यांवर शोभिवंत नकसी असती. मी लहानपणीं अशक्त होतें तेव्हां माझी आई मला हातीं धरून शिंप्या गोळा

करायास नेई, तेथें समुद्राच्या किनाऱ्यावर एका महिन्यांत म्या जितक्या शिंप्या गोळा केल्या त्यांच्या तऱ्हा पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें.

रा०— खरेंच आई? तर मग ठिकाणोठिकाणच्या गोळा केलेल्या शिंप्या एकत्र केल्यावर त्यांत त्याहूनहि अधिक तऱ्हा निघतील.

आ०— होय माझ्या मुला, एकाद्या शंख विकणाऱ्याच्या दुकानांत गेलास तर तेथें परोपरिच्या शिंप्या, शंख, इत्यादि पाहून तुला नवल वाटेल; परंतु हें तर काय, नव्या नव्या देशीं जाऊन आलेलीं तारवें नव्याच तऱ्हेच्या शिंप्या, वनस्पती आणि चमत्कारिक जनावरें यांची बातमी सांगत असतात.

रा०— बरें, यांतील प्रत्येकाच्या जाती तरी किती असतील?

आ०— उद्भिज प्रकरणांत पंचाहत्तर हजारांहून अधिक वनस्पतींचा शोध लागला आहे.

रा०— बये, इतक्या केवळ एका मनुष्यानें शोधून काढल्या नसतील.

आ०— नाहीं माझ्या बा, पुष्कळ मनुष्यांनी त्यांचा शोध लाविला आहे. तसेंच पश्वादि विद्येमध्यें लिनेयस पंडिताच्या वेळीं वीस हजार जातींचा शोध लागला होता, व अझूनहि लागत आहे.

रा०— आई, दगड आणि खनिज यांचे प्रकार किती किती असतील?

आ०— मला बरोबर ठाऊक नाहीं, परंतु ते तरी पुष्कळच असतील; आणि जीं जनावरें आतां कोठें दृष्टीस पडत नाहींत त्यांचे पंजरे जमीनींत ठिकाणोठिकाणीं सांपडतात, त्यावरून असें दिसतें कीं मागील काळांत दुसऱ्या पुष्कळ तऱ्हेचीं जनावरें होतीं.

रा०— असें आहे तर मग आपल्या पृथ्वीसारिखी दुसरी मोठी पृथ्वी नसेल?

आ०— मुला, आपल्याला राहावयास हें एक विस्तीर्ण ठिकाण आहे, यांत सर्वत्र जीवजंतु भरलेले आहेत. परंतु वर जें आकाश दिसतें त्यांत पृथ्वीचे असे अगणीत समुदाय आहेत, ते पाहिले ह्म-

णजे आपण सृष्टीमध्यें वास्तविक किती क्षुल्लक आहों हें आपणास लागलेंच कळून येईल.

**रा०**— आई, इतकें असूनहि धर्मपुस्तकांत सांगितलें आहे कीं "ईश्वराने जेव्हां मनुष्याच्या नाकपुड्यांत जिवाचा श्वास सोडिला तेव्हां तो जिवंत प्राणी झाला."

**आ०**— खरेंच; आणि मुला, अमर होण्याचें किंवा स्वर्ग नरक हीं भोगण्याचें साधून घेणें हें मनुष्याच्या हातीं आहे तसें दुसऱ्या कनीष्ट प्राण्याच्या हातीं नाहीं. पुनः एथेंहि चित्रविचित्रपणा दृष्टीस पडतो.

**रा०**—असें कसें आई; ईश्वरास सर्वांचे जीव सारिखे असावे हें बरें दिसतें.

**आ०**— मुला, सारिखे खरे, परंतु त्यांस ज्ञानशक्ति मात्र निरनिराळी दिल्ही आहे.

**रा०**— हं! ह्मणूनच कांहीं लोक शाहणे व कांहीं अज्ञान आहेत.

**आ०**— आणि तशाच त्यांच्या आवडीहि विचित्र आहेत; कित्येकांस हुशारी आवडती आणि कित्येकांस स्वस्थपणाचा उद्योग आवडतो; कित्येक सृष्टीच्या अमुक भागाचा शोध लावीत आहेत आणि कित्येक दुसरा कांहीं विषय पाहत आहेत.

**रा०**— असेंच कित्येक ज्योतिषी, कित्येक क्षितिरचनावेत्ते, पदार्थविज्ञानी, वैद्य, अथवा ग्रंथकार आहेत, नाहीं बरें?

**आ०**— होय मुला; मनुष्यें सुधारून ज्या ज्या वस्तूंची त्यांस गरज लागत गेली त्या त्या प्रमाणें उत्तरोत्तर निरनिराळ्या कौशल्यांत त्यांचें ज्ञान वाढत गेलें, मग कोणी व्यापारी, कोणी कारखानेवाले, कोणी शिल्पशास्त्री, कोणी नावाडी, शेतकरी, धनगर असे झाले.

**रा०**— लोक सारा दिवस दुकानांत किंवा कारखान्यांत कसे बसतात त्यांस कंटाळा येत नाहीं, आई?

**आ०**— मुला, मनुष्यें उद्योगांत असलीं ह्मणजे जरी त्यांस फारसें सुख नसलें तरी तेणेंकरून बरेंच समाधान असतें. ईश्व-

राने आपल्या अपार ज्ञानाने मनुष्याच्या मनाची असी कांहीं रचना केली आहे कीं त्यास जें कांहीं कर्त्तव्य असेल त्यांत तो निमग्न असतां त्याला कंटाळा न यावा. पाहा विद्यागुरू आपलीं व्याख्यानें देण्याकरितां जितकीं बारीक कारणें सांपडतील तितकीं शोधित असतो, आणि तसाच वैद्य, लोकांचीं दुःखें आणि काळजी दूर करण्याकरितां एका रोग्याकडून दुसऱ्याकडे कसा मोठ्या आनंदाने जात असतो.

**रा०**— आई, ही तर मोठमोठालींच कामें आहेत.

**आ०**— बाबा, अगदीं हलका धंदा कां असेना, परंतु त्यांत एखाद्या कामाची कल्पना करणें, तें सिद्धीस जातें कीं नाहीं तें पाहणें, किंवा बिघडलें असतां उपाय करणें या सर्व खटपटींतहि केवढी मौज आहे.

**रा०**— आई, तें मी समजलों परंतु मला वाटतें, दुष्ट लोक जे बंदिवान यांसारिख्याबरोबर कांहीं व्यवहार ठेवणें फार वाईट आहे.

**आ०**— माझ्या प्रिय राबर्ट, वास्तविक विचाराचे ख्रिस्ती आहेत ते अशा प्रकारच्या लोकांस धर्मोपदेश करण्याला तर फार प्रिय मानितात. मला ठाऊक आहे, कीं एका शस्त्रवैद्याने आपल्या खुशीने कैद्यांस उपदेश करण्यांत वर्षांचीं वर्षें घालविलीं; आणि एका चांगल्या उपदेशकाने मला सांगितलें कीं दिवस उगवला ह्मणजे तो बंदिशाळेंत जाऊन कैद्यांस अस्तमानपर्यंत उपदेश करीत असे आणि त्यांचीं मनें हळूहळू सुधरत जात तीं पाहून तो मोठा आनंद मानी.

**रा०**— आई, ईश्वराने मनुष्यें निरनिराळ्या स्वभावाचीं केलीं, हें फार चांगलें झालें. नाहीं तर सर्वांनी एकाच प्रकारच्या वस्तुची आवड केली असती, तर किती अवघड पडलें असतें बरें?

**आ०**— ह्मणून दावीदाने एकशें चवथ्या गीतांत ह्मटलें, "हे प्रभू, तुझीं कृत्यें नानाविध आहेत! हीं सर्व त्वां आपल्या बुद्धीने केलीं."

---

# प्रकरण ३.

## भाराचुरा गोळा करणें अथवा प्रकृतीचा संग्रह.

एका सुप्रभातीं, राबट हा आपल्या आईबरोबर दूर फिरावयास जावें ह्मणून निघाला, तों मार्गांत पक्षी घरोटे बांधीत आहेत; मधमाशा आपलीं मेणाचीं घरें करायास साहित्याच्या शोधांत आहेत, आणि नवीन फुटलेला पाला व पुष्पांच्या कळ्या दरदिवस मोठमोठ्या होत आहेत असे चमत्कार त्याने पाहिले.

तो शेतांतून जात असतां, ह्मणतो; बये पाहा, हां या कुपणावर पडलेली लोंकर सर्व वांया जात आहे; मी सहज गोळा करीन तर एमिली इच्या बाहुलीला गादी किंवा एकाद्या गरीब मनुष्यास उशी होईल इतकी लोंकर क्षणांत काढून आणीन.

**आ०**— बाबा, तसी आपल्या उपयोगी पडणार नाहीं, ती पिंजून स्वच्छ केली पाहिजे; असो, पण ती फुकट जात नाहीं याविषयीं तुझी खातरी करून देईन.

**रा०**— तर तिचें काय होत असेल आई?

**आ०**— काय होत असेल तें तूंच सांग पाहूं. जरा चित्त देऊन पाहसील तर तिचें कोणत्या चांगल्या प्रकारें सार्थक होतें हें तुझ्या लक्षांत येईल.

**रा०**— कोणतें सार्थक होत असेल बरें? झाडांस तर खचित तिचा कांहींएक उपयोग दिसत नाहीं; कां कीं एथें थोडीसीं झाडांवर पडली आहे पण तेणेंकरून पाहा तिच्या खालीं कोमळ पानें कसीं दाबून गेलीं आहेत तीं! बरें तीं त्यावरून काढून पाहतों. आहा! त्यावरील ओझें काढण्यासरसींच तीं आनंदाने कसीं तरतरीत उभीं राहिलीं आई. मी ज्या रीतीने तिचा उपयोग समजेन त्याकडेस माझें मन लावसील तर मोठी कृपा होईल.

**आ०**— (हळूच ह्मणती) चुप मुला, क्षणभर थांब आणि त्या लहान पक्ष्यांकडे पाहत ऐस.

हा लहान पृच्छक कांहीं वेळ थांबून पाहत आहे तों दोन चिमण्या एका डाहळीवर कांहींतरी गोळा करावें ह्मणून उड्या मारीत होत्या. मग जेव्हां त्या राबट याच्या आंगावरून भुरकन उडून गेल्या तेव्हां लोंकरीचा झुमका त्यांच्या चोंचेंत होता तो याच्या दृष्टीस पडला.

**रा०**— होहो, चिमणे, चिमणे! लोंकरीचें तूं काय करसील? तुला पिसाचें जें पांघरूण आहे तेणेंकरून तुला या ऋतूंत पाहिजे तितकी ऊब येईल.

**आ०**— मुला, त्यांस स्वतः नको, पण आपलीं लहान पिलें उबवायाकरितां लोंकरीचा गरम बिछाना केला पाहिजे, याशिवाय पांघरुणाकरितां मेंढ्यांची लोंकर चोरून घेण्याची त्यांस काय गरज?

**रा०**— त्या आपल्या मुलांचे बिछाने कुपणावर शोधायास खऱ्याच येतात काय?

**आ०**— होय खऱ्याच; आणि चिमण्याच येतात असें नाहीं तर दुसरेहि पुष्कळ पक्षी आपल्या घरोंट्यांस आच्छादन करावें ह्मणून किंवा अधिक ऊब यावी किंवा दुसऱ्या पदार्थांबरोबर विणावी ह्मणून ही पडलेली लोंकर शोधायास येतात, यास्तव तूं ध्यानांत ठेव कीं आज जी लोंकर कुपणावर दिसत आहे ती महिना पंधरादिवसांत अगदी नाहींसी होईल.

**रा०**— केवढा चमत्कार हा! आई, या वस्तुकरितां अमुकच ठिकाणीं जावें असें त्यांस कोण शिकवीत असेल?

**आ०**— बाबा, त्यांस ईश्वर शिकवितो; कावळे व डोमकावळे, हे तर कधीं कधीं मेंढ्यांच्या पाठीवरची लोंकर चोंचींनी तोडतोडून नेत असतात.

**रा०**— पण मेंढे त्यांस कसें तोडूं देतात आई?

**आ०**— बा! त्यांस मोठें सुख वाटतें, ह्मणून तर ते मुकाट्यानी उभे राहून आपलें गरमी करणारें ओझें काढूं देतात.

**रा०**— पण कदाचित त्यांची लोंकर उगीच कातरूं लागलों

असतां त्यांस आवडणार नाहीं वाटतें, कां कीं त्या दिवसीं जेव्हां धनगर लोंकर कातरूं लागला तेव्हां पाहिलेंस ना त्याचे मेंढे कसे हात पाय झाडूं लागले ते.

**आ०**— बाबा, ते भिऊन गेले असतील, अणखी पाहा कीं जसा तुला आपले लांब केस कापून टाकायास आनंद वाटेल परंतु दाट कापले असतां आवडणार नाहीं तसें त्यांसहि आवडलें नसेल.

**रा०**— आतां माझे केस कापून टाकले तरीं कांहीं चिंता नाहीं कां कीं त्यापासून मला पुढें काय सुख होईल तें मला ठाऊक आहे; परंतु मेंढ्यांची लोंकर आपण कशासाठीं कापतों हें त्यांस समजावून सांगितलें तरी ते ऐकणार नाहींत.



**आ०**— होय ऐकणार नाहींत, पण त्यांस विचार करण्याची शक्ति नाहीं ह्मणून कांहीं दुःख झालें असतां ते तसे हात पाय झाडून दाखवितात.

**रा०**— पक्ष्यांस घरोंटे करायास अणखी दुसऱ्या कोणकोणत्या वस्तु पाहिजेत?

**आ०**— कोणत्याहि वस्तूचा चाराचुरा. चिमणी तर विंध्या, पानें, केंस, दोरे, रेसीम, लोंकर, पेंढा, चार, असी भेळसेळ टिपून नेत असती.

रा०— तर मला वाटतें, त्यांस कांहीं मिळालें तरी टिपून नेतील, लोंकर किंवा गवत शोधायाची फारसी मेहनत घेणार नाहींत.

आ०— त्यांस अमुकच वस्तु पाहिजे असें नाहीं, जुन्या घरोट्यांतील शिलक सांपडली तर तिचाहि उपयोग करतील.

रा०— असें आहे तर त्या आपले जुने घरोटे मोडून टाकीत नसतील.

आ०— हो! त्या एवढ्या खटपटींत पडणार नाहींत. चि-



मण्यानी ज्या वस्तूचा पूर्वीं उपयोग केला ती टाकून देतात किंवा कसें हें पाहावें ह्मणून एका दिवसीं दाईने गतवर्षाचा एक जुना घरोटा होता तो मोडून खिडकीखालीं इकडेतिकडे उडवून दिल्हा.

रा०— मग पक्ष्यानी काय केलें?

आ०— त्यांहीं त्या काटक्या उपयोगाच्या पाहून मोठ्या आनंदाने वरचेवर सर्व उचलून नेल्या, आणि त्यांचा एक चांगला नवा घरोटा केला. तो फार सुंदर झाला नाहीं तरी त्यांचे शेजारीं

ज्यानी नव्या जिनसा आणून घरोटे बांधिले होते त्यांच्यासारिखा चांगला आणि जसा त्यांस पाहिजे होता तसाच केला.

रा०— चमत्कारिक लहान पक्षी! बरें, दाईने जर तो घरोटा मोडला नसता तर तशा जुन्या घरोट्यांत त्या राहत्या कीं नाहीं आई?

आ०— जुन्या घरोट्यांत थोडकेच पक्षी राहतील; बहुतकरून सर्व पक्ष्यांचा प्रतिवर्षी आपल्यास नवे घरोटे बांधायाचा शिरस्ता आहे.

रा०— आई, तर ह्या सुंदर प्राण्यांकडे मला फार लक्ष दिल्हें पाहिजे; त्यांस शहाणपणाचे मार्ग केवढे ठाऊक आहेत.

आ०— म्या गवत व घोड्याचे केस गुंडाळून गुंडाळून पेंडोळ्यासारिखे केलेले फार सुंदर घरोटे पाहिले आहेत.

रा०— घोड्याचे केंस कोठून आणीत असतील आई?

आ०— काय तोटा, घोडशाळांचे आसपास गळून पडलेले केंस फार सांपडतात; आणि मुला! जनावरांचीं चांबडीं जेथें रांपत घालितात असल्या ठिकाणीं चांबड्यापासून सुटे झालेले केंस पडलेले असतात ते टिपून आणण्याकरितां पुष्कळ पक्षी तेथें जात असतात. कांहीं जनावरें आपल्यावरील उष्ण आच्छादन वसंत ऋतूंत गाळून टाकितात. आणि पक्ष्यांस जी ईश्वराने प्रेरणा दिल्ही आहे तिच्या योगाने ते त्या ठिकाणीं केंसांच्या शोधार्थ जातात.

तीं एका नव्या शेताकडे वळतांच, राबर्ट मोठ्याने ह्मणतो, आहा! आई, एथें लहान पक्षी किती उद्योगांत आहेत; पाहा ते काय करितात बरें?

आ०— कां, हिवाळ्यांत तेथें गवताचा गंज होता त्याची तुला आठवण नाहीं. तो आतां वसंतऋतूंत सरून गेला तथापि पक्ष्यांस घरोटे करायाजोगल्या त्यांतल्या पुष्कळ काड्या पडल्या आहेत! ते पाहा गवताच्या काड्या घेऊन कसे उडत आहेत ते!

रा०— आई पाहाणे त्या ह्यातान्या कावळ्याने आपल्या चोंचींत पेंढ्याची केवढी जाड काडी धरली आहे, ती जशी काय एक कारवीच.

**आ०**— आणि कित्येक पक्षी लहान लहान डाहळ्याहि घेऊन उडतात; आणि कित्येक आपल्या घरोट्यांत कोणी येऊं नये ह्मणून कांटेरी झाडांच्या डाहळ्या बाहेरच्या बाजूस लावितात.

**रा०**— आई, एथें पाहा हीं किती पिसें जमीनीवर पडलीं आहेत; अरेरे! मला वाटतें कुत्र्याने किंवा मांजराने एकाद्या गरीब पक्ष्यास खाल्लें असावें.

**आ०**— होय कदाचित तसेंहि असेल, पण दुसरे पक्षी हीं लहान पिसें नवे घरोटे करायास मोठ्या काळजीने गोळाकरून नेत असतात हो. कोंबडीं, बतीं, जेथें ठेवितात त्या ठिकाणीं ते पिसांकरितां वारंवार जातात. कित्येक पक्ष्यांस दुर्वा आणि शेवाळ यांची फार गरज लागती.

**रा०**— म्या एक सुंदर घरोटा पाहिला त्यावर पिवळी काभरी बुट्टी होती, कोणी ह्मणेल कीं ती शोभेसाठींच दिल्ही असेल.

**आ०**— तसाच चिखल आणि चिकणी मातीहि त्यांस फार उपयोगी आहे, मुला, एका जातीच्या चिमण्या आहेत त्या आपले कोटे चिखलाने बांधितात आणि लहान कोमळ पिल्यांस रुईच्या, कांटेधोतऱ्याच्या किंवा दुसऱ्या झाडांच्या बियांतील मऊ केसर आणून तिजवर ठेवितात.

**रा०**— आई, पक्ष्यांस इतका उपयोगी जो केरकचरा तो आपण जाळून टाकीत असतों हें फार वाईट. नाहीं बरें?

**आ०**— खरेंच मुला, आपणास जो कांहीं निरुपयोगी कचरा असेल तो आपण एका कोनपडांत नेऊन ठेवावा आणि जर तो जनावरांच्या उपयोगी असेल तर तीं तेथें अपसुक जाऊन त्याचा उपयोग करतील. एका जातीचा पक्षी आहे त्यास सुतेऱ्याच्या जाळ्याची फार गरज पडती. त्यांतले बारीक तंतु व कांहीं नाजूक शेवाळ आणून तो आपला कोटा मोठ्या मेहनतीने सुमारें एक तसू जाडीचा बांधतो.

**रा०**— तर मग तो पक्षी सुतेऱ्यांचीं जाळीं फार तोडीत असेल.

**आ०**— बहुतकरून तो, कुपणावर जेथें सुतेरे जाळीं घालून

हिंवाने मरून जातात अशा ठिकाणीं अथवा जेथें सुतेरे फारकरून असतात तेथें शोध करीत हिंडत असतो. दुसऱ्या एका जातीचा पक्षी आहे तो आपले घरोटे झाडांचीं बारीक मुळें घेऊन बांधतो; शेतांतील उंदरास सुतारांनी तासून टाकिलेला सालपा, आणि रानडुकरास सुकीं पानें लागत असतात.

रा०— पण आई, पावसाळ्यांत जेव्हां पुष्कळ पानें कुजतात आणि त्यांचा वाईट वास येऊं लागतो तेव्हां मोठा वारा सुटून तीं पानें सुकत आणि दुर्गंधी नाहींसी होई तोंपर्यंत मला रानांत जावेंसें वाटत नाहीं.

आ०— पण मुला, जीं पानें झाडावरून खालीं पडतात तीं त्या झाडांसच उपयोगी आहेत. तीं कुजल्यावर त्यांचें जमीनीला चांगलें खत होतें, मग दुसऱ्या वर्षी झाडांवर फळें चांगलीं येतात. खतहि पुष्कळ प्रकारचें असतें, कोणतें खत ह्मटलें तरी कांहीं पदार्थ कुजून त्याचें होतें; यावरून पाहा कीं जो कचरा वांया जातो व ज्यापासून हवा बिघडून नाना तऱ्हेचे रोग होतात तोच कचरा कामास लाविला असतां किती उपकारक होतो मुला!

रा०— आई, खत कोणकोणत्या वस्तुचें होतें बरें?

आ०— आज सकाळीं मी एक पुस्तक वाचीत होतें, त्यांत असें लिहिलें आहे कीं फ्रान्स देशांत सुपीक द्राक्षक्षेत्राला खत घालायाचें असलें तर दुसरें कशाचें घालीत नसत, द्राक्षवेलीचेंच बारीक तुकडे कापून जमीनींत खोल पुरून ठेवीत ह्मणजे त्याचें नामी खत होई.

रा०— आणि तें शेतांतल्या खतासारिखेंच उपयोगी पडतें आई?

आ०— त्याहूनहि चांगलें; आणि त्याला तितकी मेहनत व खर्चहि पडत नाहीं.

रा०— माझ्या बागाला खत पाहिजे ह्मणून कदाचित आपण पानें कापून तसें केलें तर होईल ना?

आ०— होय, तसें शेतांत जें निदण उगवतें तें काढून वर खाड्यांत भिजत घातलें आणि अगदी कुजेपर्यंत खालीं वर करीत

गेलें तर त्याचें पाहिजे तसें उत्कृष्ट खत होईल. कित्येक प्रांतांत समुद्र किनारच्या पाल्याचें खत करीत असतात.

रा०— मला वाटतें जमीनीस निरनिराळ्या वस्तूचें खत घालीत असतील कां कीं तूं मला सांगितलें आहेस कीं सर्व माती एकसारिखीच नसती.

आ०— खरेंच मुला, कित्येक प्रकारच्या जमीनीला कुजलेला भाजी पाला खतासाठीं घालितात, व कित्येकांस जनावराचें अवशेष; दुसऱ्या कांहीं आहेत त्यांस दोहोंची भेळ पाहिजे, किंवा नुसत्या निरनिराळ्या मातीची भेळसेळ असलीं तरीं पुरे.

रा०— तर मग शेतकरी व माळी यांस जर एकाच गांवांत निरनिराळ्या प्रकारच्या जमीनीची लागवड करावयाची असली तर त्यांस पुष्कळ धोरण राखलें पाहिजे आई?

आ०— यांत काय संशय, नाहीं तर त्यांची मेहनत कशी सफळ होईल, म्हणून जमीनीस जसजसें खत घालायाचें असेल तसतसें त्यांस कसेवाड्यांतून रक्त, नळांतील चिखल, नदीचा गाळ, जनावरांचीं हाडें किंवा समुद्र किनारची कुजलेली मासळी आणावयाची तजवीज करावी लागती.

रा०— आई उत्कृष्ट धान्य किंवा सुरस मेवा जो आपणास फारमा आवडतो तो उत्पन्न करायास असल्या घाणेरड्या वस्तु लागतात हा केवढा चमत्कार आहे; असो, पण रक्ताचें खत घातलें म्हणजे फारच विलक्षण दिसतें. बरें पुष्कळ फळें व बिया निरर्थक जात नसतील? रानफुलें तर इतकीं दिसतात कीं आपल्याच्यानें सारीं कधींहि खुडवणार नाहींत. नुसत्या या कुपणाकडे पाहा म्हणजे पुरे.

आ०— माझ्या प्रिय मुला, झाडांच्या नुसत्या बियांवर व फळांवर किती पक्षी व जनावरें चरत असतात. हिंवाळा गेला म्हणजे जमीनीवर जे पानाचे ढीग पडलेले असतात त्यांत गळून पडलेल्या बिया शोधितांना पक्ष्यांच्या टोळ्या तूं वारंवार पाहत नाहींस?

रा०— होय होय, ते चोची कां मारितात तें पाहून मला आश्चर्य वाटे.

आ०— त्याप्रमाणेंच खाटकी, कोळी, किंवा कोंबडी बतीं विकणारे यांच्या दुकानांतील चाराचुऱ्यावर कुत्रे, मांजर आणि दुसरीं पुष्कळ जनावरें आपलें पोट भरितात. म्या एक बुडून मेलेल्या घोड्याचें शरीर समुद्रतिरीं पडलेलें पाहिलें, त्याचें मास पहिल्याने हळूहळू कोल्हे व कुत्यानी खालें, नंतर पक्ष्यानी आणि कीटकानी खालें शेवटीं हाडांचा पांजरा मात्र राहिला.

रा०— होय होय, हा मोठाच चमत्कार?

आ०— कित्येक मासे आहेत त्यांची मास खाण्याची असी कांहीं चतुराई सांगतात कीं कोणी तत्वज्ञान्याहि दर्यांतून प्रवास करीत असतां पक्ष्यांचे व जनावरांचे नमुने तारवाच्या बाहेर टांगून ठेविले, मग ते कांहीं दिवसानी पाहतात तों मांसाच्या ठिकाणचा सर्व भाग खाऊन नुसतीं हाडें मात्र ठेविलीं होतीं.

रा०— आई, समुद्रांत जो इतका पाला वाढतो तो मासे खात असतील कीं नाहीं?

आ०— मला वाटतें नुसता पालाच खाऊन राहणारे असे पुष्कळ मासे आहेत; त्या पाल्यांमध्यें कित्येक शिंप्यांत राहणारे मासे आपले कोटे करितात आणि तो कुरतुडलेला असतो त्यावरून तो त्यांचा भक्ष आहे असें उघड दिसून येतें.

रा०— आई, जनावरांस वेळेचे वेळेवर पाणी प्यावें लागतें पण साऱ्यांस तसें कोठून मिळत असेल?

आ०— मेंढे, घोडे, आणि गाई यांसारिखीं पाळीव जनावरें जीं सुख्या दाण्यावर चरतात त्यांस पाणी अवश्य पाहिजे, यास्तव जे कोणी त्यांस बाळगितात ते जवळ झरा किंवा तळें नसलें तर त्यांस कोठून तरी आणून पाजितात. परंतु याशिवाय पुष्कळ प्राणी रसाळ फळें किंवा बिलबिलीत कीटक अथवा गोगलगाया खाऊन आपली भूक व तहान भागवितात.

रा०— आणि जे कोणी सुक्या बिया खाऊन राहतात ते काय पीत असतील?

**आ०**— माझ्या लाडक्या, एथें पाहा कीं, प्रत्येक दंवाचा किंवा पावसाचा प्रत्येक थेंब ईश्वराच्या कांहीं प्राण्यांस किती उपयोगी पडतो! तें पक्ष्यांस आपल्या घराजवळच्या भांड्यांतून अथवा प्रातःकाळीं झाडांच्या पानांवरून पाणी पितां त्वां पुष्कळ वेळा पाहिलें असेल.

**रा०**— कोईच्या पानांवर त्यांस पुष्कळ पाणी मिळेल.

**आ०**— होय, तेथें ते मुद्दाम जातात, कां कीं त्यांवर दंव पडलेलें असतें इतकेंच नाहीं तर तीं पानें एकासीं एक डकलेलीं असतात, त्यांच्या फटींत कीटक व गोगलगाया फार सांपडतात.



**रा०**— आणि लहान पक्षी कीटकांस शोधून काढीत असतील?

**आ०**— होय; तेणेकरून आपल्या पुष्कळ भाज्यांचें संरक्षण होतें, नाहीं तर ते गलगलीत प्राणी खाऊन टाकिते किंवा नासिते.

**रा०**— कीटकांस पानें आवडतात हें मला ठाऊक आहे, कारण कीं मजजवळ रेशमाचे किडे होते ते तुताच्या झाडांचीं पानें फार खात असत.

**आ०**— आणि पक्ष्यांस कीटक न आवडते तर ते अधिकाधिक वाढून फार नुकसानी करिते.

रा०— आई, कीटक काय खातात?

आ०— कित्येक आहेत ते फळें खातात; कित्येक मधमाशां-सारिखे पुष्पांतील मध खातात; परंतु आपल्या दृष्टीस अगोचर असा एकादा जरी बारीक़ कण त्यांस सांपडला तरी तो पुरेसा होतो.

रा०— तरीच आज सकाळीं लहान बाळ सत्रंजीवर फेणी खावयास बसलें होतें ती जागा चाकरिणीने साफ झाडून टाकिली असतांहि तेथें माशांचा थवा जमलेला म्या पाहिला त्यावरून आतां मला वाटतें कीं त्या कांहीं बारीक राहिलेले कण खात असतील.

आ०— वा! बरोबर तर्क केलास; ती माशांची टोळी मी नीट लक्ष लावून पाहत होतें; त्या जे लहान लहान कण टिपीत ते त्यांच्या अल्प क्षुधेस पुष्कळ होत; बहुतकरून कोणत्याहि सांडलेल्या चाऱ्याचुऱ्यास त्याच्या यथायोग्य गिऱ्हाइक आहेच मुला!

रा०— आई, ईश्वर प्रत्येक प्राण्यांचा कसाकसा समाचार घेतो तो पाहिला असतां मनाचें फार रंजन होतें.

आ०— बाबा, ईश्वराने सर्व प्राण्यांची असी कांहीं तजविज करून ठेविली आहे कीं, एकास जें निरुपयोगाचें असेल तें दुसऱ्याच्या उपयोगीं पडतें ह्मणून कांहींएक निरर्थक जात नाहीं तर अशा तजविजीचा विचार करून पाहिल्यावर केवढें आश्चर्य वाटेल!

रा०— यावरून, "चाराचुरा गोळा कर कीं कांहीं निर्फळ जाणार नाहीं" हें वाक्य अक्षरशः खरें आहे असें दिसतें.

आ०— माझ्या प्रिय मुला, त्याच वाक्याविषयीं मी एक कथा वाचली, तींत मी ज्या गोष्टी तुला सांगत आहें तशा बऱ्याच होत्या. त्या वाक्याचें तात्पर्य, ही कथा वाचून माझ्या मनांत जसें ठसलें तसें पूर्वीं ठसलें नव्हतें.

रा०— मी खचीत सांगतों कीं आतां मी कोठें गेलों तरी हें वाक्य ध्यानांत ठेवीन.

आ०— टिपणाऱ्यांविषयीं यहूदी लोकांस जी ईश्वराची आज्ञा झाली आहे त्यावरून चाऱ्याचुऱ्याकडेसहि आपणास दुर्लक्ष करणें योग्य नाहीं.

रा०— बये, टिपणाऱ्यांविषयीं धर्मपुस्तकांत कांहीं सांगितलें आहे काय?

आ०— होय, रुथ टिपणाऱ्याची सुंदर गोष्ट कदाचित तुला आठवत असेल. या दाणे टिपण्याच्या पुरातन चालीविषयीं मोश्याचा उपदेश खेरीज करून दुसऱ्या अशा आज्ञा आहेत कीं, धान्य फार बारकाईनें गोळा करूं नये, किंवा द्राक्षक्षेत्राची फार चौकसी ठेवूं नये, कां कीं दीन व प्रवासी यांस त्यांतून कांहीं तरी अंश मिळूं दिल्हा पाहिजे.

रा०— बरें, त्या टिपणाऱ्यांस गोळा करायास पुष्कळ मिळत असेल काय?

आ०— त्यांस थोडें मिळालें तरी ते मोठा आनंद मानितात. आपल्या शेजारांत जे गरीब लोक राहतात त्यांस टिपण्याच्या हक्काविषयीं जितका अभिमान असतो तितका दुसऱ्या कशाविषयीं असत नाहीं. ते परिपक्क धान्यांच्या जुड्या शेतांतून बांधून घरीं आणितात तेणेंकरून त्यांस हुशारी येती व शरीरास चांगलें आरोग्य राहतें.

रा०— होय, आरोग्य राहतें खरें, ह्मणून तर गतवर्षीं उन्हाळ्यांत मला टिपायाला जाऊं दे, असें ह्मणत होतों.

आ०— मुला, फार तर काय सांगूं, ज्या वायूचा आपण श्वासोश्वास घेतों तो देखील वांया जात नाहीं; कां कीं जितका वायु आपल्या फुफूसांतून खराब होऊन बाहेर येतो तितका सूर्य कीर्णांच्या योगानें झाडांचीं पानें लागलींच शोषण करून घेतात आणि तेणेंकरून तीं चांगलीं वाढतात.

रा०— तर शहर सोडून खेडेगांवांत राहणें आरोग्य असेल ना आई?

आ०— होय, कां कीं तेथें हवा मोकळी असती. परंतु म्या पुष्कळ ठिकाणीं वाचिलें आहे कीं दाट शहरांत ठिकाणी ठिकाणीं मैदानें व बाग केले आणि झाडें लाविलीं तर तेथची कोंडलेली हवा मोकळी होऊन आरोग्यकारक होईल.

रा०— ठीक, आतां ते पुष्कळ ठिकाणीं नवीं नवीं मैदानें करीत

आहेत ह्मणून मला आशा आहे कीं माझा चुलतभाऊ पहिल्यापेक्षां बळकट होऊन चांगला लालबुंद होईल.

**आ०**— मलाहि तसेंच वाटतें. सृष्टीच्या रचनेचा शोध करितां करितां मनुष्यास पुष्कळ ज्ञान प्राप्त झालें आहे; तत्वज्ञानी यांस ज्या गोष्टी समजायास कठीण वाटत होत्या त्या आतां ईश्वराचे कर्तृत्वासीं लावून पाहतां सोप्याशा वाटूं लागल्या आहेत.

**रा०**— हं हं, त्या कशा?

**आ०**— पाहा डोळ्याचा शोध करूं लागल्यामुळें चसम्याच्या कांचांची युक्ती निघाली; कानाचा शोध करितां करितां बहिऱ्या मनुष्यानें कानास शिंगाकृतीचें यंत्र लावून ऐकण्याची किंवा भिंतीला चमत्कारिक आकृती करून त्यांतून बोलावें अशा अशा युक्ती निघाल्या. विलायतेंत ओक झाडाच्या बुंदाच्या आकृतीवरून ऐडीस्टोन नामक दिवा दांडीची हल्लींची बांधणी केली; बीवर जनावर आपल्या कोटयासभोंवती बांध घालितें तो पाहून दर्याच्या आणि नद्यांच्या पाण्यांस बांध घालण्याची युक्ती निघाली.

**रा०**— खरोखर आई, हें फारच आश्चर्यकारक आहे.

**आ०**— मूळचे सूत कांतणारे ह्मटले तर कीटक आणि सुतेरे होत; पहिला कागद करणारा भ्रमर कीटक होय; पहिला सांधकाम करणारा सुतार जातिची मधमाशी आहे, शिंपी आणि विणणारे यानी पाहिजे तर आपल्या धंद्याची मूळ तत्वें पक्ष्यांपासून शिकावीं. नावाडी, वलेकरी, आणि सुकाण्या यानी मासे कसी कवाईत करितात ती पाहून शिकावें. फार काय सांगावें पाणबुड्यासाठीं जीं घांटेसारिखीं यंत्रें केलीं आहेत त्यांचें कळासुत्र शिंप्यांतील जीव आपल्या खुशीप्रमाणें वर येतात किंवा खालीं जातात त्याप्रमाणेंच आहे.

**रा०**— बये, पुढें चालूं दे; अणखी काय?

**आ०**— इमारती बांधायास शिकायाचें असलें तर उधयीच्या मुंग्या आपले कोटे कसे करितात तें पाहावें; जागेची व्यवस्था, किंवा एकएक बारीक कण मिळून मेण करण्याचें चातुर्य, राज्याची रचना, आणि प्रत्येकानें काम वांटून घेऊन बेतबातानें कसें चालावें

हें पाहावयाचें असल्यास मधमाशापासीं जावें. उद्योग आणि दुरवर विचार याचें उदाहरण द्यावयाचें असलें ह्मणजे मधमाशीचें देत असतात.

**रा०**— अबब! आई, या इतक्या गोष्टी माझ्या लक्षांत पूर्वी कधींच आल्या नव्हत्या.

**आ०**— इतर प्राण्यांस जी ईश्वरी प्रेरणा आहे तिणेंकरून ते आपले भक्ष कसे शोधून काढितात तें पाहून पाहून मनुष्यास आहार व पुष्कळ उपयोगी औषधें यांचा शोध लागला आहे.

**रा०**— आहा! आई, जेथें पाहावें तेथें कोणी तरी प्राणी सुखाने नांदत आहे असें दिसतें.

**आ०**— वास्तविक; असें कोणतेंहि स्थळ सांपडणार नाहीं कीं



निपेंथीस नामक वनस्पती.

जेथें एकादी वनस्पती किंवा जनावर चांगलें वाढत नाहीं किंवा प्रत्येक जिवंत वस्तुची इच्छा तृप्त करणारा जो भगवान तो आपल्या औदार्यें करून त्यास पाहिजे तितकें देत नाहीं.

**रा०**— आई, एक रेतीचें मैदान खेरीज करून सर्वत्र जिवंत प्राणी आणि वनस्पती सांपडतील वाटतें.

**आ०**— कां पुष्कळ कीटक व दुसरे बारीक जीव जे दृष्टीस अगोचर ते त्यांत देखील राहतात; त्यांस खावयास कांहीं नसतें ह्मणून ते एकमेकास खाऊन वांचतात. रेतीच्या मैदानांत कोठेंकोठें

झाडांचीं निळवट बेटें असतात तीं, 'उंट ज्यास मैदानावरचें तारूं ह्मटलें आहे' त्यास विसावा घेण्याची जागा आहे. आणि पाहा मुला, त्यास पाणी भरून ठेवण्याकरितां एक चमत्कारिक सांठवण दिल्हें आहे ह्मणून त्याला दररोज पाणी प्यावयाची गरज पडत नाहीं. आणि त्या मैदानांत राहणारे कीटक निपेंथीस किंवा पिचर नामक वनस्पतीच्या पाल्यांत दंव सांचलेलें असतें तें पिऊन आपली ताहान भागवितात.

**रा०**— आहा! ईश्वर आपल्या प्राण्यांचा खराच फार समाचार घेतो.

**आ०**— होय, अणखी त्यांस पुढें काय लागेल त्याचाहि अधीच संग्रह करून ठेवितो.

**रा०**— कशाचा संग्रह आई? मला वाटतें जेवढें धान्य उत्पन्न होतें तेवढें तर सारें प्रतिवर्षी खाऊन टाकितात.

**आ०**— पाहा, कित्येक वृक्षवल्ली ज्यांवर खावयाचीं फळें येतात तीं मोठीं वाढायास किती वर्षे लागतात. सध्या ही गोष्ट असो, परंतु माझ्या मनांत आपल्यास फार उपयोगी जे खनीज पदार्थ त्यांविषयीं बोलायाचें आहे.

**रा०**— मला वाटतें ते वाढायास फारच काळ लागत असेल.

**आ०**— मोठमोठ्या पदार्थविज्ञान्यानी अवलोकन करून या विषयावर जे शोध केले आहेत त्यावरून असें दिसतें कीं, जमीनींत खनीज पदार्थ जसजसे असतील तसतसा त्यांस अधिक उणा काळ लागतो.

**रा०**— आई, केवढा चमत्कार हा!

**आ०**— चमत्कार ह्मणून काय सांगावा, पाहा कीं भूमीकंप होऊन जंगलाचीं जंगलें गरक होतात तथापि अशा उत्पन्नानेहि मनुष्यास एका मोठ्या सुखाचें साधन होतें. अशा जंगलांत दगडी कोळशाच्या खाणी असतात आणि कित्येक खाणींत कुजलेले परंतु तसेच शाबुद वृक्ष सांपडतात.

**रा०**— तर तो दगडी कोळसा जमीनींत वाढायास फार काळ लागत असेल ना?

कित्येक वनस्पती सांपडतात तशा या पृथ्वीवर कोठेंच नाहीत ह्मणून त्या कितीका काळाच्या असतील तें सांगवत नाहीं.

**रा०**— माझा चुलता चार्लेज यास दुसरून भेटायास जाईन तेव्हां मी त्या पाहून ठेवीन.

**आ०** तसाच ज्वालामुखी पर्वतांतला वितळलेला रस कठीण झाला ह्मणजे त्याचा प्युमीस नामक एक उपयोगी दगड होतो. याच प्रकारें प्रकृतीच्या विशाळ कोठारांत आपल्या सुखासाठीं ज्या ज्या वस्तु अगत्याच्या आहेत तितक्या सर्व आपणांस सांपडतील, परंतु प्रकृतीचा स्वामी जो ईश्वर त्याची असी आज्ञा आहे कीं त्याचा उपयोग केल्यापूर्वी प्रकृतीचा एकहि कण व्यर्थ जाऊं देऊं नका.



# प्रकरण ४.

---

मोराचें पीस अथवा प्रकृतीचें सौंदर्य.

कोणी एक डाक्तर साहेब एका खेडे गांवाच्या हद्दीवर चांगला वाडा बांधून राहत असे; त्याच्या आसमंतात जमीनी, पर्वत, नद्या, वनें, दरी, यांहीकरून तो फार शोभायमान दिसत होता. त्याने आपल्या मनोरंजनार्थ तरतऱ्हेचे मृग व पक्षी बाळगले होते, त्यांतून जे कांहीं मरत त्यांत मसाला भरून ते मोठया चौकसीने रक्षून ठेवी. याप्रमाणें त्याने दुसऱ्या पुष्कळ चमत्कारिक पदार्थांचा संग्रह करून ठेविला होता. या गृहस्थाला संतान नव्हतें, तथापि तो व त्याची स्त्री या उभयतांस लहान मुलांची फार आवड असे, यास्तव जीं मुलें त्यांच्या घरीं दिवानखान्यांत बसायास जात त्यांचा चांगला सत्कार होई आणि तेथें परोपरीच्या वस्तू पाहून व तत्सं-बंधी भाषणें ऐकून त्यांस पुष्कळ ज्ञानहि प्राप्त होई.

एका संध्याकाळीं राबट याला त्यानी मोराचा कुंचा बक्षिस दिल्हा, तेणेंकरून तो मोठा खुशाल झाला, आणि घरीं येऊन आपल्या आईस ह्मणतो, बये, हा पाहा, मी एक अपूर्व जिन्नस आणली आहे; यांतलें एकहि पीस मोडलें नाहीं. डाक्तर साहेबांची मडम ह्मणाली कीं, त्यांच्या जवळ पुष्कळ कुंचे आहेत तथापि त्यांत यासारिखा चांगला एकहि नाहीं.

**आई.**— पाहिलें असतां तिने तुला एकाद्या मोडक्या कुंचाचा तुकडा द्यावा, परंतु ज्यापेक्षां असा चांगला दिल्हा त्यापेक्षां तिची तुजवर फार ममता आहे असें दिसतें. आहा! याचे रंग किती उत्कृष्ट व तेजस्वी आहेत !

**रा०**— आई, त्यांवर हे ठिपके पाहा! जिकडचे तिकडे कसे

एकसारिखे लागले आहेत. सारीं पिसें मोठीं वाढल्यानंतर ते ठिपके होत असतील काय?

**आ०**— असें नाहीं मुला, प्रत्येक पीस जसजसें वाढत जातें तसतसें त्यावर रंग आणि एक ठिपका किंवा डोळा येऊं लागतो.

**रा०**— हं हं! समजलों. तूं सांगतीस तसेंच असेल. पण आई, मोर सोगा पसरतो तेव्हां सर्व पिसें किती नामी दिसतात! पाहा, इतकीं पिसें आहेत तथापि त्यांतून एकहि विस्कळीत झालेलें दिसत नाहीं. तीं मोजून पाहूं बरें; एक, दोन, तीन— खचित मला वाटतें तीं शंभर असतील.

**आ०**— मुला, शंभर कांहीं फार झालीं असें समजूं नको.



असो, पण एकच पीस तपासून पाहा ह्मणजे त्यांत काय करामत आहे ती तुझ्या लक्षांत येईल.

**रा०**— आहा! केवढे लांब! आई, तुझ्या हस्तिदंती गजानें मोजून पाहूं बरें, शेपटाचें लांब पीस दीड गज लांबीचें आहे. पाखाचीं बाहेरील पिसें आंतल्या बाजूचे गोल पिसापेक्षां फार लांब आणि मुळाकडेस अगदी उघडीं आहेत.

**आ०**— वास्तविक; मी तुला सांगितलें आहेच कीं ईश्वरानें आपल्या प्राण्यांच्या सुखासाठीं एवढ्या वस्तू केल्या आहेत कीं त्यांचा पार नाहीं, असें असतां त्याच्या कृत्यांत अप्रयोजक ह्मणसील तर कांहींच सांपडणार नाहीं; पाहा मुला, त्या लांब पिसाचीं मुळें उघडीं नसतीं आणि त्यांवर कुसूं असते, तर त्यांचा भार होऊन पक्ष्यास फार गरमी होती व अवघडाहि पडतें आणि तेणेंकरून सौंदर्यहि वाढलें नसतें.

**रा०**— आई, प्रत्येक कुसूं एक लहानसें सुंदर रंगलेलें पीस दिसतें.

**आ०**— प्रत्येक कुसावर रंगाचा अंश अशा प्रमाणानें असतो कीं मोर आपला सोगा पसरतो तेव्हां शेपटींवरील सर्व ठिपके एकसारिखे आणि सुंदर दिसतात.

**रा०**— जेव्हां मी ह्या ठिपक्याकडे नीट लक्ष लाऊन पाहतों, तेव्हां दांड्याच्या प्रत्येक बाजूस त्याचा अर्धभाग स्पष्ट दिसतो, असें असतां ते दोन्ही भाग एकासीं एक किती सफाईनें जडून राहतात, पाहा!

**आ०**— राबट, अणखी प्रत्येक लहान कुसूस उलट सुलट बाजू असती; त्याची रंगीत बाजू वरल्याकडेस असून तो कुसूं लहान मोठा ज्या ठिकाणीं जसा असावा तेवढाच असतो.

**रा०**— त्याविषयीं म्या कधींच विचार केला नव्हता. होय पिसाची पाठ खरीच निराळी दिसती आई.

**आ०**— अणखी त्यांची रचनाहि किती डौलदार आहे! पाहिलीसना? वरच्या बाजूकडेस वळत वळत जाऊन शेवटीं तरतरीत होऊन पसरतात; पाहा त्यांची आकृति कसी धनुष्याकार असती! तसाच प्रत्येक बाजुचा रंगहि किती चांगला असतो!

**रा०**— आई, प्रत्येक ठिपक्यांत एक, दोन, तीन— दाहा निरनिराळे रंगाचीं वर्तुळें आहेत, ते रंग एकमेकांत किती सफाईनें मिसळून गेले आहेत! बरें, तेथें रंग कसे आले असतील, कोण जाणें?

**आ०**— पुष्कळ विद्वान लोक ज्यानी ते रंग तपासून पाहिले

आहेत, त्यांसाहि याविषयीं मोठें नवल वाटतें. असें ह्मणतात कीं त्या ठिपक्यांची उत्पत्ती एका प्रकारच्या प्रवाही पदार्थापासून आहे; पक्षी जसजसा वाढत जातो तसतसा तो प्रवाही पदार्थ सुकून त्याची शिंगासारिखी नळी व नाजूक कुसूं होऊं लागतात, नंतर त्यांस हळूहळू सौंदर्य येतें; पुनः एकएका कुसूंचे फार बारीक परंतु घट्ट जडलेले भाग होतात असे कीं त्यास किंचित वारा लागला असतां ते हालूं लागतात.

**रा०**— आहा! आई, तें खरेंच चमत्कारिक आहे मला वाटतें, हें कांहीं आपोआप होणार नाहीं.

**आ०**— माझ्या प्रिय मुला, इतकी सफाई आपोआप कधींच



मोराचें पीस.

व्हावयाची नाहीं, हें तुला मी सिद्ध करून देईन. पाहा मजजवळ एक मोराचें जुनें पीस आहे. त्याच्या दोन्ही बाजूचे कुसूं दांडीपर्यंत कापून टाकितों; मग तें कुसूं घेऊन त्यावरचा ठिपका तुला पुन्हा रचितां येतो कीं, पाहा; एथें हा कागदाचा शुभ्र ताव आहे त्यावर ठेव. सर्व कुसूं एकत्र भेळूं?

**रा०**— फार चांगलें; तुझ्या मनांतून हें कूट बसवावें असें आहे तर भेळून टाक; मजजवळ एक नवें पीस आहे तेंच समोर ठेवून रचायास लागतों.

**आ०**— ठीक आहे. मी वखारींतलें कांहीं सामान काढायास जातें तोंपर्यंत दोन घटका तूं एकलाच बैस ह्मणजे तें स्वस्थ चित्तानें चांगले होईल.

इकडे राबट यानें आपलें काम मोठ्या उत्कंठेनें चालू केलें; त्याची बहुतेक खातरी होती कीं मी तें लवकरच संपवून टाकीन. पहिल्यानें त्या ठिपक्याच्या दोन्ही बाजुचे कुसू घेऊन रचूं लागला तों त्यास फारच कठीण वाटलें त्यानें त्या ठिपक्याच्या बाहेरील जांबळ्या रेघेच्या भागास आरंभ केला आहे इतक्यांत त्याची आई परत आली.

तो ह्मणाला, कां आई, इतक्यांत दोन घटका झाल्या. मी तर नुसता ठिपका रचायास लागलों आहे.

**आ०**— राबट, मला तर तीन घटका मोडल्या; असो, पण तूं पुरें केलें नाहींस हें मला केव्हांच समजलें, कां कीं तसें असतें तर मला तेथेंच बातमी लागली असती.

**रा०**— वास्तविक. माझ्या मनांत तसेंच होतें आई कीं तयार झालें ह्मणजे लागलेंच तुला कळवावें; असो, तपासून पाहिलें एवढ्यानेंच याला फार हर्ष झाला कां कीं समोर नमुना असताहि एकादें पीस रचायास केवढें चातुर्य पाहिजे हें आतां मला पुरतेपणीं समजलें बरें आई, त्यांत कधीं कांहीं व्यंग नसतें?

**आ०**— मुला, त्यांत कधींहि व्यंग दिसायाचें नाहीं, कां कीं मोराचीं पिसें फार सुंदर आहेत असें धर्मपुस्तकांत योब याचें वाक्य आहे, आणि या पक्षाविषयींच्या प्राचीन काळच्या लेखांत पिसांचें ज्याप्रमाणें वर्णन केलें आहे त्याप्रमाणेंच आज दिवसपर्यंत तीं दृष्टीस पडतात.

**रा०**— आई, डाक्तर साहेबाच्या मडमीजवळ जो मोर आहे त्यासारिखेच सर्व मोर चांगले असले तर किती लक्ष पिसें करावीं लागलीं असतील?

आ०— मुला, तीं मोजवणार नाहींत, कां कीं मोर आपलीं पिसें प्रती वर्षी गाळितो, आणि त्याबद्दल त्यास नवीं फुटतात.

रा०— आई, एवढें सौंदर्य आणि आश्चर्यकारक करामत असून तीं एकच वर्षपर्यंत टिकती हें मोठें नवल आहे. सर्व पक्षी आपलीं पिसें असींच प्रती वर्षी गाळितात?

आ०— होय, कित्येक जातीचे पक्षी आहेत ते याहूनहि लवकर गाळितात.

रा०— वर्षाच्या कोणत्या काळांत गाळितात?

आ०— निरनिराळ्या ऋतूंत; परंतु फारकरून वसंतऋतूंत किंवा पावसाळ्यांत, आणि कधीं दोन्ही ऋतूंत; यास वार्षिक पक्ष गाळणी ह्मणतात.

रा०— आतां मला आठवण झाली. एक दिवस आजीचा बुलबूल पक्षी फार दीन व उदास दिसला तेव्हां ती ह्मणाली कीं, तो आपले पक्ष गाळीत आहे, परंतु त्या वेळेस मी तें बरोबर समजलों नाहीं.

आ०— पिसें गाळिते वेळेस पुष्कळ पक्षी लाजल्यासारिखे करितात; विशेषेंकरून मोराचा सोगा लहान होत गेला ह्मणजे तो फारसा कोणाच्या दृष्टीस पडत नाहीं.

रा०— बरें, पिसें जुनीं झालीं ह्मणजे गाळून टाकितात, किंवा कसें?

आ०— ज्यानी ही कृती नीट लक्ष लावून पाहिली आहे व गाळून टाकलेलीं पिसें तपासलीं आहेत ते असें सांगतात कीं त्यांतलीं बहुतेक पिसें कच्चीं, मोडकीं, तुटकीं असतात व त्यांचा रंग अंधुक असतो.

रा०— तर हें कसें आई?

आ०— तें असें आहे कीं, जोंपर्यंत तीं पिसें पक्ष्याच्या अंगीं जडलेलीं असतात, तोंपर्यंत त्याच्या अंगांत कांहीं रस आहे, तो त्यांत जाऊन तीं टवटवीत दिसतात; परंतु तीं जुनीं झाल्यावर त्यांच्या ठिकाणीं नवीं येतात तेव्हां तो रस त्या जुन्या पिसांस पोहंचत

नाहीं, तेणेकरून तीं खराब होतात. फार कशास, तुझ्या दुधाचे दांत पडून गेल्यावर दुसरे नवे आले तसेंच हें आहे.

रा०— तर आई, मजजवळचें मोराचें पीस तुझ्या पिसापेक्षां अधिक तेजस्वी आणि पक्क झालेलें दिसतें याचें कारण तेंच असेल?

आ०— होय तेंच; मजजवळचें जुनें पीस एका वाड्यांत कोंबडीं बर्दी ठेविलीं होतीं तेथें गळून पडलेलें मला सांपडलें; परंतु तुझें पिस डाक्तर साहेबाच्या मडमीने सांगितलें कीं, एक चांगला पुष्ट झालेला मोर खाण्याकरितां कापिला त्याचें होतें.

रा०— आई, त्या मोराच्या डोक्याविषयीं मी तुला सांगायास विसरलों. आहा! त्यावरची कलगी किती सुंदर होती! त्यांत कांहीं मसाला भरून तें तसेंच रक्षून ठेविलें होतें, ह्मणून डाक्तर साहेबाची मडम मला ह्मणाली कीं, नुसतें पाहावयाचें असल्यास पाहा, बक्षीस मागसील तर तें माझ्यानें देववणार नाहीं.

आ०— त्या कलगीला कसकसीं पिसें होतीं तीं त्वां पाहिलीं?

रा०— होय, तीं सारीं चोवीस होतीं त्यांचे दांडे पांढरे तरतरीत होते, आणि त्यांवर लहान लहान हिरव्या पिसांचे झुमके कोणी ह्मणेल सोन्याच्या शाईंतून बुडवून काढले आहेत असे चकाकत होते.

आ०— तर तीं पिसें सोग्याच्या पिसांहून अगदीं भिन्न होतीं?

रा०— अगदीं भिन्न आई—तीं लहान कुंच्यासारिखीं पाहून मला तर फार आश्चर्य वाटलें, कां कीं मी पहिल्याने समजत होतों कीं सर्व पिसें सारिखीं केलेलीं असतील; रंगांत मात्र भेद असेल.

आ०— तसें नाहीं माझ्या प्रिय मुला, जरीं सर्व पिसें बहुतकरून कांहिसीं सारिखीं दिसतात, तरीं पक्ष्यांस ज्या ज्या कामासाठीं तीं पाहिजेत त्या त्याप्रमाणें त्यांच्या रचनेंत पुष्कळ फेरफार असतो.

रा०— आई, पहिल्याने तीं सर्व सारिखीं कशीं असतात तेंच कृपा करून सांग.

आ०— पाहा, तीं सर्व दांड्यावर वाढतात, आणि तो दांडा कांहीं कमी आश्चर्याचा आहे असें समजूं नको हो.

रा०— खरेंच काय? दांड्यांत तर कांहींच चमत्कारिक दिसत नाहीं.

आ०— तुझे वडील खोलींत लिहावयास बसले आहेत तर त्यांजवळून एक हंसाचें आखें पीस मागून आण ह्मणजे तें आपण तपासून पाहूं.

राबट धांवत गेला, आणि हंसाच्या व कावळ्याच्या पिसांचे नमुने, आणि पोपटाचे व नुऱ्यांचे पिसानी भरलेली एक लहान पेटी लवकरच घेऊन आला.

रा०— आणली आई; पण बाबा ह्मणतो, हीं लंडन शहराचीं पिसें मला ओळखायास बरीं पडतील. पण हंसाच्या ह्या साध्या पिसांत आश्चर्य वाटायाजोगें काय आहे बरें!

आ०— दाखवून ह्मणती. ह्याच्या बुंदाकडे पाहा; तुला काय वाटतें, हें कशाचें केलें असावें; मांसाचें किंवा हाडाचें?



कचें हंसाचें पीस.

रा०— आई, दोहोंतून एकाचेंहि नाहीं, परंतु फारकरून शिंगाचें असेलसें वाटतें.

आ०— तें शिंगाचें नाहीं मुला, परंतु असा एक पदार्थ आहे कीं, ज्याचें दुसरें कांहींच होत नाहीं. त्यांत लांबचेलांब उभे तंतु आहेत ते समान अंतरावर वाटोळे आढ्यानी बांधले आहेत, असे कीं पीस हलकें व टणक असून लवविलें असतां पूर्वस्थितीवर यावें.

रा०— आई, हें मला अगदीं ठाऊक नव्हतें.

आ०— आपण हंसाचे पीस कापून लेखणी करितों तेव्हां जर त्या पिसावरचे आटे तासून टाकले नाहीं तर चिरतांना त्या लेखणीचे तंतु सारखे चिरणार नाहींत. पाहा, मुला मी हें पीस आटे तासून टाकिल्याशिवाय चिरलें ह्मणून त्याला कशा खांडी पडल्या आहेत त्या.

रा०— खऱ्याच आई; आतां तूं हें दुसरें खरवडून चिरलेंस तें कसें सारखें चिरलेलें दिसतें! बरें तूं जें खरवडून काढलेंस तें काय?

आ०— तो गीर आहे, त्याच्या योगानें पीस वाढत जातें इतर प्राण्यांच्या कोणत्याहि भागांत सांपडणार नाहीं असा हा एक पदार्थ पक्ष्यांस विशेष आहे हो.

रा०— आई, बाबाच्या पेटींतील सर्व लहान पिसांस असेच चमत्कारिक दांडे आहेत?

आ०— होय; गुंगणारा पक्षी इतका लहान असतो तरी त्याचा पिसारा घारीच्या पिसांसारिखाच गुरपाटलेला असतो.

रा०— पण हंसाच्या पिसाचे कुसूं जेवढे दाट असतात तेवढे मोराचे सोग्यांतील पिसांचे असत नाहींत आई.

आ०— त्याचें कारण असें कीं, हंसाचीं पिसें आपण लिहावयास घेतों तीं त्या पक्ष्याच्या पाखांतून काढितात तर उडण्यासाठीं त्याचे कुसूं इतके दाट असले पाहिजेतच आणि प्रत्येक कुसूं त्याच्या जवळच्या कुसूला शेकडोंसे बारीक तंतूच्या दातांत अडकविलेला असतो.

रा०— बये, ते मला दिसत नाहींत तर.

आ०— मुला, ते सूक्ष्मदर्शक यंत्रावांचून दिसावयाचे नाहींत, इतके बारीक आहेत; एक तसुभर जागेंत यांतील तंतु एकहजार मावतील.

रा०— आहा! किती आश्चर्यकारक हें!

आ०— खालच्या बाजूकडे जे कुसू वळलेले असतात ते गोंडेदार होऊन त्यांस दुसऱ्या फांद्या फुटतात तशा समोरच्यांस फुटत नाहींत, परंतु ते वरल्याकडेस वळत जातात.

रा०— तर ते पराकाष्ठेचे बारीक असतील. ते सूक्ष्मदर्शक यंत्रावांचून दिसणार नाहींत यांत काय आश्चर्य! पण आई, हे लहान कुसू एकांत एक कशाकरितां अडकवून ठेविले आहेत?

आ०— जोराने उडतां यावें ह्मणून. जर तूं लक्ष लावून पाहसील तर हंसाच्या पिसाचे तंतु मोराच्या पिसांच्या तंतुसारिखे जडविले नाहींत असें तुला दिसेल.

रा०— आई, तें माझ्या लक्षांत आलें, मोरांच्या पिसांच्या कुसूंची चपटी बाजू आपणाकडे असती, परंतु हंसाच्या पिसांच्या कुसूंची बाजू आडवी असती.

आ०— ठीक समजलास. अणखी ते हंसाच्या पिसाचे प्रत्येक बाजूवरचे कुसूं तंतुनी इतके जवळ जवळ विणलेले असतात कीं ते पक्ष्यास हवेंत शिडाप्रमाणें उपयोगी पडतात.

रा०— तर आई मला वाटतें, लहान पक्ष्यांच्या पाखांतील तीं चमत्कारिक पिसें मोठीं होत तोंपर्यंत त्यांला उडतां येत नसेल ना?

आ०— नाहींच; आणि ही एक गोष्ट ध्यानांत धरायाजोगी आहे कीं प्रत्येक जातीच्या पक्ष्यास पिसांचा जो भाग अगत्याचा असतो तोच पहिल्याने येतो; यास्तव कोवळीं पिल्लीं घरोट्यांतून बाहेर उडायाजोगीं झालीं ह्मणजे पहिल्याने त्यांच्या पाखांचीं पिसें फुटतात नंतर दुसरीं पिसें येतात; परंतु कोंबडीचीं पिल्लीं ती तर पक्षी, आणि बतीं हीं लहान असतांच धावूं लागतात ह्मणून त्यांस पहिल्याने मऊ लोमीचें आच्छादन येतें.

रा०— खरें आई, तें म्या पाहिलें आहे. आपल्या घराच्या छप्पराला गंवडी जेव्हां डागडुजी करीत होता तेव्हां त्याने त्यांतून एक चिमणीचा घरोटा काढिला; त्यांत लहान लहान पिल्लीं होतीं त्यांचें सर्वांग उघडें असून पहिल्याने पाखें फुटूं लागलीं तीं पाहून मला आश्चर्य वाटलें कां कीं आपलीं बतीं आणि कोंबडीचीं पिल्लीं यांच्या अंगावर पहिल्याने केसाचें उष्ण आच्छादन येऊन नंतर पिसें फुटतात असें म्या पाहिलें होतें.

आ०— पक्षी पाखें फडफडावितात किंवा आपल्या जवळून

उडून जातात तेव्हां त्यांच्या पाखांचा कसा ध्वनी निघतो तो तूं ऐकिला आहेस मुला.

रा०— होय; बंगल्याच्या सभोवतीं चिमण्या आपल्या घरोट्यांत जात येत असतात तेव्हां तसा ध्वनी म्या पुष्कळदां ऐकला आहे.

आ०— खरें मुला, परंतु तसा घुबडाच्या पाखांचा आवाज होत नाहीं हो, कां कीं तें रात्रीच्या निवांत वेळीं शेतांतील भितरे उंदिर धरायास जातें तेव्हां ते उंदिर जरा तो ध्वनी ऐकतील तर त्यापासून तेव्हांच निसटून जातील, ह्मणून त्या पक्ष्याच्या पाखाची असी कांहीं निराळ्या तऱ्हेची रचना केली आहे कीं उडतांना त्यांचा कांहींच आवाज होऊं नये.



रा०— हा एक चमत्कार आहे; परंतु त्याचे पंख कसे असतात आई?

आ०— त्याच्या पिसांचे कांठ मोडलेले असतात. पाहा एथें तुझ्या वडिलाच्या संग्रहांत एक घुबडाचें पीस आहे त्याचे दांते पाहा अगदी फणीसारिखेच आहेत.

रा०— पक्ष्याच्या पाखांचीं पिसें मोराच्या सोग्यांतील पिसांसारिखी सुटीं असतीं तर त्यांस चांगलें उडतां येतें कीं नाहीं?

आ०— नाहीं. याचें उदाहरण पाहिजे असल्यास पाहा, शहामृगाच्या पाखाचीं पिसें सुटीसुटीं असतात ह्मणून त्याला उडतां येत नाहीं.

रा०— आई, त्या शहामृगाचीं सुंदर पिसें त्याच्या उपयोगी पडत नसलीं तर तीं मडम लोकानी आपल्या लेण्यासाठीं घ्यावीं.

**आ०**— असें कां ह्मणतोस? पण तीं त्या पक्ष्यास धावण्याची त्वरा करायास फार उपयोगी पडतात. असेंच मुला, इम्यु व कासवेरी नामक पक्षी यांचीं सुंदर आणि चमत्कारिक पिसें जरी उडायाजोगीं नाहींत तरी तशा पक्ष्यांस त्यांचें चांगलें आच्छादन होतें. तसींच पेनग्वीन नामक पक्ष्याची माझ्यासारिखीं आखुड पाखें उडायाच्या कामाचीं नाहींत तरी तेणेंकरून त्यास पोहतां चांगलें येतें.

**रा०**— इम्यु व कासवेरी नामक पक्षी म्या पाहिले आहेत, परंतु मला वाटतें त्यांच्या आंगावर एका प्रकारचे केस असतात.

**आ०**— नाहीं, तीं बारीक नाजूक पिसें; प्रत्येक पिसाला लांब लांब कुसूं असतात तें दुरून पाहिल्यावर रेशमी केसासारिखे दिसतात. त्या पिसांचा विशेष गूण हा आहे कीं प्रत्येकास दोन किंवा तीन दांड्या फुटतात.

**रा०**— खरेंच काय? तर तो मोठा चमत्कार होय.

**आ०**— तितका केवळ चमत्कार नाहीं. पोपट, मकाज नामक पक्षी आणि दुसरे कित्येक पक्षी यांस कोठें कोठें तसीं दुहेरी पिसें येतात; परंतु तीं दोन्ही पिसें सारिखीं वाढत नाहींत, त्यांतून एक लांब आणि मोठें होतें आणि दुसरें लवेच्या पिसासारिखें अगदी लहान राहतें.

**रा०**— आई, लवा ह्मणजे काय? कोणी एक गृहस्थ बाबाजवळ गोष्ट सांगत होता कीं एक मनुष्य इडर नामक बदकाच्या लवेचा शोध करीत असतां त्याचा पाय एका खडकावरून निसटून तो मरतां मरतां वांचला.

**आ०**— राजहंसाच्या लवेचा गलबंद केला आहे तो तुला दाखवितें, नीट लक्ष लावून पाहा.

राबट यानें तो उलटा सुलटा फिरवून पाहिला, नंतर त्यांतला एक झुमका सुटा करूं लागला, आणि ह्मणाला, "आई यांत लहान लहान बारीक पिसांचे झुमके आहेत परंतु चांगलें टणक असें एकहि पीस दिसत नाहीं.

**आ०**— बरें ह्मटलेंस.

रा०— पण आई, ती कशावर जडली आहे? —त्वचेवर?

आ०— होय, तीच राजहंसाची त्वचा. या लहान पिसांचे झुमके त्यावर स्वभाविक जसे सफाईदार जडलेले असतात तसे कोणासहि जडवितां येणार नाहींत.

रा०— आई, सर्व पक्षांच्या पाखाखालीं लवा असती काय?

आ०— नाहीं, विशेषेंकरून ती जलचर पक्ष्यांस असती. ते सर्वकाळ पाण्यांत पोहतात व भक्ष्याच्या शोधार्थ उड्या मारितात ह्मणून त्यांच्या शरीरांत उष्णता राखण्याकरितां ती उपयोगी आहे असें दिसतें.

रा०— तर आई, इडर बदक अंगावरील लवा काढण्याकरितां मनुष्यें त्याच्या घरोट्याकडे चढून जाण्याची इतकी खटपट कशाला करितात? ते पक्षी आपल्या भक्षासाठीं पाण्यांत पोहत असतात तेव्हांच गोळी घालून कां मारीत नाहींत?

आ०— त्यांस ठाऊक आहे कीं ते पक्षी घरोटे बांधूं लागले ह्मणजे त्यांच्या अंगावर लवा फार वाढूं लागती तीच तोडून ते आपल्या लहान पिल्लयांस उष्ण बिछाने करितात. दुसरें, मनुष्यास समजलें आहे कीं, त्या लवीचा आपल्याला नरम बिछाना व थंड हवेंत उष्ण आच्छादन चांगलें होईल. याजकरितां तिची मोठी किंमत ठरविली आहे.

रा०— अरेरे! आपल्या एका बिछान्यासाठीं बापड्या गरीब पक्ष्यांचे घरोटे चोरावे लागत असतील? ती लवा त्या पडद्यासारिखीच पांढरी आणि सुंदर असती आई?

आ०— नाहीं; असें सांगतात कीं विलायतेंत पाण्यांत पोहणारे सर्व लहान पक्ष्यांचे बाहेरील पिसांवर कसाहि रंग असला तरी त्यांच्या त्वचेवरची लवा काळ्या रंगाची असती.

रा०— काळ्याच रंगाची कां आई?

आ०— त्याचें कारण असें आहे कीं, त्या रंगांत उष्णता राखून ठेवण्याचा गूण आहे; आणि याच कारणानें हिवाळ्यांत त्या देशामध्यें पक्ष्यांचे थंडीपासून संरक्षण होतें.

रा०— आई, विलायतेंत उन्हाळा आला ह्मणजे पक्ष्यांस

पुष्कळ कीटक खावयास असतात तरीं ते रोडके होऊं लागतात याचें कारण काय?

आ०— मुला, त्याचें कारण असें आहे कीं, हिवाळ्यांत थंड वारा आंगास लागूं नये ह्मणून ते आपलीं पिसें फुगवून धरितात तेणेंकरून ते दिसण्यांत पुष्ट झालेले दिसतात परंतु वसंतऋतूंत आणि उन्हाळ्यांत थंड वारा आंगास लागला असतां बरा वाटतो यास्तव ते पिसें ओढून जवळ जवळ धरितात ह्मणून तसे कृश झालेले दिसतात.



रा०— माझ्या चुलत भावाजवळ एक पाळलेलें घुबड आहे. त्याच्या उरावर म्या एक दिवस हात फिरविला तेव्हां त्याचीं पिसें माझ्या हातास जीं कांहीं मऊ लागलीं तीं काय सांगूं!

आ०— रात्रीस ते आपल्या भक्षाच्या शोधार्थ उडत असतात तेव्हां त्यांचीं विरूळ पिसें थंडीपासून संरक्षण करायास फार उपयोगी पडतात. जे पक्षी उष्ण घरोट्यांत राहतात किंवा जे विलायतेंत नुसते उन्हाळ्यांत राहून मग तिकडून निघून जातात अशा पक्ष्यांस मोठ्या पिसाऱ्याची गरज लागत नाहीं.

रा०— त्यांस दंवाने किंवा धुक्याने अपकार होत नसेल?

आ०— पाण्यापासून त्यांस कांहीं अपकार होऊं नये ह्मणून त्यांस विशेषेंकरून पिसें दिल्हीं आहेत असें दिसतें. कोंबडीचीं पिल्लीं पावसांत सांपडलीं असतां त्यांच्या पाठीवरून पाणी कसें निसटून जातें तें त्वां पाहिलें असेलच; तशांत पक्षांस पावसाचे सरींत बाहेर पडणें आवडत नाहीं, पडले तर लागलेच छायेखालीं येतात.

रा०— कबुतरें सरदींत घरीं राहतात; आणि म्या तुला वारंवार ह्मणतां ऐकलें आहे कीं, "पाऊस येत आहे; सर्व पक्षी जितके लवकर जाववेल तितके घरीं उडत चालले आहेत."

आ०— तें वास्तविक.

रा०— पण आई, बदकें आणि राजहंस पाण्यांत अगदीं निःकाळजीनें पोहतात असें दिसतें, तसेंच त्यांस पाण्यांत डुबकायासहि फार आवडतें.

आ०— मुला, अणखी त्यांस मांसग्रंथी असतात त्यांतून एक तेलकट प्रवाही पदार्थ निघतो तेणेंकरून त्यांच्या त्वचेस पाण्यापासून कांहींच अपकार होत नाहीं; पाहिजे तेव्हां हा तेलकट पदार्थ आपल्या पिसांस लावून तीं विस्कळीत झालीं असतां पुनः नीट करितात.

रा०— ते आपलीं पिसें सरळ व व्यवस्थेने राखण्याविषयीं फार चौकस असतात असें दिसतें; चिखलाचा एकादा शिंतोडा अंगावर उडाला तर तो लागलाच काढून टाकितात.

आ०— होय, ती तर मोठी अगत्याची गोष्ट आहे, कां कीं पिसें तूं ह्मणतोस तसीं सरळ व व्यवस्थित रचलेलीं आहेत तर त्यांतून पाण्याचा प्रवेश कधीं होणार नाहीं, आणि जर करितां तीं विस्कळीत असलीं तर त्यापासून इजा होईल.

रा०— असें आहे तर बदकें डामडौलांत आपला काळ निरर्थक घालवितात असें आतां मी ह्मणणार नाहीं.

आ०— आपलीं पिसें मऊ, गुलगुलीत, आणि विखरलीं असतां ठाकठिकीनें राखावीं हा पक्ष्यांचा अंगस्वभाव आहे, आणि तसीं राखिल्यानें त्यांचें सौंदर्यहि खूब दिसतें.

रा०— म्या कधीं मळीण हेंदरा असा पक्षी पाहिला असें मला आठवत नाहीं, एक आजारी पडला तो मात्र तसा होता.

आ०— जर ते आपलीं पिसें ठाकठिकीनें राखणार नाहींत तर तीं गळून पडतील किंवा मोडून जाऊन अगदींच उपयोगी पडणार नाहींत.

रा०— डाक्तर साहेबाच्या मडमीनें मला एक मेलेला कोंबडा दाखविला, तो जिवंत असेल तेव्हां त्यास आपलीं पिसें नीट करायास केवढी मेहनत पडत असेल बरें? आई त्याचा सोगा, व मस्तकावरील तुरा खेरीज करून दर पाखांत किती लांब लांब पिसें होतीं! बरें तुला काय वाटतें, तो कोंबडा आंड्यांतून निघाल्यापासून सर्व पिसें एका वर्षांत वाढून मोठीं झालीं असावीं किंवा कसें?



सोन कोंबडा.

आ०— मुला, कित्येक पक्ष्यांस तसीं सुंदर पिसें आंड्यांतून निघाल्यापासून दोन तीन, किंवा त्याहूनाहि अधिक वर्षेंपर्यंत येत नाहींत. वेळोवेळीं ते आपलीं पिसें गाळितात तसीं त्यांस नवीं आणि मोठमोठीं फुटतात.

**रा०**— त्यांस एवढ्या सोग्याचा काय उपयोग पडत असेल बरें?

**आ०**— ते पक्ष्यांस उड्डान रोखून धरायास सुकाणाप्रमाणें उपयोगी पडतात, ह्मणून ज्या पक्ष्यांचे सोगे आखूड त्यांचे पाय लांब असतात ह्मणून उडतांना ते आपले लांब पाय ताणून मागें धरितात; परंतु लांब सोग्याचे पक्षी उडत्या वेळीं आपले आखूड पाय पोटाजवळ धरितात.

**रा०**— आई, तुला काय वाटतें, प्रत्येक पीस कांहीं उपयोगाचें असेल?

**आ०**— कोण जाणें नसेल; कदाचित ईश्वराने त्यांस नुसत्या सौंदर्यासाठींच दिल्हीं असतील. विणा पक्षी, मोर आणि दुसऱ्या यांचीं पिसें पाहा किती सुंदर असतात.



विणा पक्षी.

**रा०**— त्यांचा उपयोग असेल आई, परंतु इतकेंच कीं तो आपल्या लक्षांत येत नाहीं.

**आ०**— पक्ष्यांच्या मस्तकांवरील तरतऱ्हेचे तुरेहि कांहीं कमी आश्चर्याचे असतात असें समजूं नको.

रा०— चित्रांत म्या पुष्कळ पक्ष्यांचे तुरे पाहिले आहेत; आणि डाक्तर साहेबानें मेलेले पक्षी मसाला भरून ठेविले आहेत त्यांत तर फारच पाहिले, त्यांतून कांहीं कुंच्यासारिखे तरतरीत उभे होते, कांहीं मुगुटाप्रमाणें आणि पंख्यासारिखे पसरले होते, आणि कांहीं पाठीमागें पडलेले होते.

आ०— मुला, कित्येक देशांतील पक्ष्यांच्या मस्तकावरील तुरे फार नाजूक असतात; त्यांच्या बारीक दांड्याच्या शेवटास जीं रुंद रंगीत पातें असतात त्यांवर सूर्यकिरण पडलें ह्मणजे तीं केवळ पाचीप्रमाणें दिसूं लागतात.

रा०— डाक्तर साहेबाच्या मडमीच्या टोपीला एक चमत्कारिक सुंदर पिसांचा घोस आहे; तीं पिसें पांढरीं, वांटोळीं आणि फुगरीं आहेत; तीं कोठून आणलीं असतील कोण जाणें? कां, आई, त्या दिवसीं ती आली होती तेव्हां तूं पाहिलीस ना?

आ०— हंहं, तीं मारिबो नामक पिसें? तीं माळढोक पक्ष्याच्या पाखांतील खालच्या बाजुची काढितात मुला, त्या पक्ष्यास तीं उष्णता देण्यासाठीं आहेत असें दिसतें.

रा०— बरें आई, त्वां इतक्या वस्तु मला सांगितल्यास त्यांत पक्ष्याच्या आच्छादनासारिखें सर्वांहून आश्चर्यकारक दुसरें कांहींच नाहीं असें मला वाटतें.

आ०— एका विद्वानाचें असें ह्मणणें आहे कीं सर्व पिसें, पर उपटून टाकलेला तितूर एकाद्या चतुर मनुष्यापुढें नेऊन ठेवावा आणि त्यास ह्मणावें कीं पक्ष्यास अशा प्रकारचें आच्छादन करून दे कीं, त्यांत हलकेपणा व उष्णता असून या पिसांत जेवढे गुण असतील तेवढे असावे, आणि ऊन पाऊस वारा इत्यादिकांपासून त्याचें संरक्षण व्हावें आणि तशांत तो पक्षी कसा असतो तो पूर्वी कधीं पाहिला किंवा त्याविषयीं ऐकलें नसावें तर तो काय करील बरें?

रा०— आहा तो बापुडा! अगदीं गोंधळून निराश होईल आणि तें काम सोडून देईल यांत संशय नाहीं.

आ०— होय खरेंच एवढ्यावरून पाहा कीं सर्वांचा उत्पन्न

कर्ता जो परमेश्वर त्याचें चातूर्य व परोपकार किती अपरंपार आहेत ते!

रा०— आई, देवदुतांचीं पाखें कशीं असतील?

आ०— मुला, देवदुतांस पाखें असतील असें संभवत नाहीं, त्यांस पाखें आहेत आणि ते उडतात असें कोठें कोठें लाक्षणीक रितीने ह्मटलें आहे, त्याचा अर्थ इतकाच कीं, ईश्वराने त्यांस कोठें जावयास आज्ञा केली ह्मणजे कांहीं अडथळा न होतां ते आपला मार्ग अति त्वरेने क्रमितात.



# प्रकरण ५.

---

## वार्षिक प्रवासी अथवा स्थलांतर करणें.

एक दिवस राबट हा आईस ह्मणाला, आई, आपल्या मागल्या दारीं सुंदर पिवळ्या रंगाचे पक्षी येत आणि झाडांवर बसून मंजुळ शब्द करीत असत त्याची तुला आठवण आहे? मजजवळ बसून तूं त्यांकडे फार वेळ पाहत होतीस.

**आई** — होय मला आठवण आहे, त्यांतून कांहीं फार मधुर स्वरानें गात असत.

**राबट**— त्यांहीं बागेंत आपले घरोटे जवळ जवळ बांधून एका उंच माडाच्या झावळ्यांस नेऊन टांगले होते ते पाहिलेस ना, आई? त्यांचे घरोटे फार चमत्कारिक असत. माळ्यानें मला एक दाखवायास आणला होता तो भोपळ्यासारिखा दिसे.

**आ०**— हे घरोटे मोठ्या चतुराईनें विणलेले असतात ह्मणून त्या पक्ष्यांस विणणारे पक्षी किंवा कोष्टी असें ह्मणतात.

**रा०**— पण आई, फार दिवस झाले त्यांतला एकहि पक्षी आतांसीं माझ्या दृष्टीस पडत नाहीं. ते कोठें गेले?

**आ०**— ते दुसऱ्या देशांत गेले असतील. मुला, आपण त्यांस यंदा ज्या ऋतूंत झाडांवर फडफडतांना पाहिले त्याच ऋतूंत ते दुसऱ्या वर्षी परत येतील.

**रा०**— आई, सर्व पक्षी प्रतिवर्षी असेच जात येत असतात?

**आ०**— नाहीं; परंतु प्रतिवर्षी एक देश सोडून दुसऱ्या देशीं जाणारे असे पुष्कळ पक्षी आहेत त्यांतले बहुतेक सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणाऱ्यांस ठाऊक आहेत.

**रा०**— बरें, ते पक्षी एवढी खटपट कशासाठीं करितात?

आ०— त्याचीं पुष्कळ कारणें आहेत; कांहीं पक्षी आपल्या भक्ष्याच्या शोधार्थ; कांहीं आपल्या पिल्यांच्या सुखासाठीं; व कांहीं आपल्यास हवा मानत नाहीं या हेतुने; आणि कांहीं नुसते मनुष्यांच्या उपयोगी पडावे ह्मणून जातात.

रा०— आई, असे स्थलांतर करणारे पक्षी नेमलेल्याच ऋतूंत प्रवासास निघतात काय?




कोकिल.

आ०— मुला, त्यांचा प्रवास इतका नेमल्या वेळेवर होतो कीं बहुतेक गांवकरी लोक कांहीं पक्ष्यांच्या येण्याजाण्यावरून आपला प्रतिवार्षिक कामाचा वेळ जाणत असतात. तसाच त्यांच्या चालण्याचाहि नियम इतका बरोबर असतो कीं दर वर्षास ते अमुक ठिकाणीं अमुकच महिन्यांत एक दोन दिवसांच्या अंतराने जाऊन पोहंचतात.

रा०— त्यांचा उडण्याचा प्रकार कसा आहे? टोळ्याच्या टोळ्या करून, किंवा कोणाच्या लक्षांत येणार नाहींत असे एकामागून एक, निरनिराळे उडतात?

आ०— याविषयीं त्यांच्या निरनिराळ्या चाली आहेत.

कांहीं पक्षी रुंद पसरलेल्या टोळ्या करून उडतात; कांहीं लांब परंतु अरुंद हारीने; आणि कित्येक दोन तीन पुढारी पुढें काढून त्यांच्या पाठीमागें पाचर आकृतिसारिखे जमून जातात. दुसरे थोडके असे पक्षी आहेत कीं त्यांच्या नर व मादा वेगळा वेगळा प्रवास करितात.

रा०— आई, एका जागेंत राहणारे पक्षी भिन्न भिन्न ठिकाणीं जातात काय?

आ०— तसे जाणारे क्वचित. पाहा पोहणारे किंवा पाणथळ जागेंत फिरणाऱ्या पक्ष्यांनीं जरी स्थलांतर केलें तरी ते फारकरून पाण्याच्या जवळच जाऊन वस्ती करतील. या प्रकारचे इडर बदक व करढोंक पक्षी यांस समुद्र किनारा फार आवडतो; ते आपले घरोटे खडकाच्या छिद्रांत बांधितात. चिखलाचा किनारा किंवा उथळ नद्या ज्यांतून चालतां येईल असीं स्थळें करढोंक व सारस या पक्ष्यांस प्रिय आहेत. पुनः कित्येक हंस व बदक वगैरे त्यांस पाणथळ जमीनीच्या सांचलेल्या पाण्यांत चालावयाची मोठी मौज वाटती.

रा०— आई, हे पक्षी इतके दूर उड्डान सर्व ऋतूंत सारिखेच करीत असतील?

आ०— नाहीं माझ्या मुला, त्यांस आपल्या मुकामावर पोंहचायास तोंडचा वारा किंवा पाऊस लागला असतां उशीर होतो त्यांतून कित्येक मध्येंच दमून मरून जातात, कित्येकांस मोठाले पक्षी खाऊन टाकतात ह्मणून त्यांची संख्या कधीं कधीं फारच कमी होती.

रा०— गरीब बापडे पक्षी! दम खाल्याशिवाय त्यांस केवढें दूर उडून जावें लागतें!

आ०— कांहीं पक्षी आहेत ते पंचवीस कोसपर्यंत समुद्र पार उडून जातात. गोवी पक्षी तारवावर विसांवा घेतांना वारंवार समुद्रांत दृष्टीस पडतात.

रा०— हहँ, आई, ते इतके लांब उडतांना थकून जात असतील बरें?

आ०— असें सांगतात कीं, पक्ष्यांस नेहमीपेक्षां फार दूर जावयाचें असल्यास थोडक्याच वेळांत कोणत्या जवळच्या मार्गानें जातां येईल तो मार्ग ते शोधून काढतात. स्पेन देशाच्या दक्षिणेकडेस जिब्राल्टर नामक शहर आहे तेथें एक जंगमशोधी राहत होता, तो गोवी पक्ष्यांस प्रतिवर्षी स्थलांतर करितांना पाही, त्यांविषयीं तो असें सांगतो कीं, ते पक्षी जिब्राल्टरची समुद्रधुनी उलंघून पलिकडे आफ्रिका खंडाच्या उत्तर टोंकाला जाते वेळीं पहिल्यानें किनाऱ्यावर साहा किंवा आठ जणांची एक एक टोळी करीत, आणि मग पाण्याच्या अगदी सपाटीजवळून उडून पलिकडे टांजीयर शहराचें अरुंद टोंक पुढें आलें आहे त्यावर जाऊन उतरत.



गोवो पक्षी.

रा०— आहा! किती शाहाणे पक्षी!

आ०— बाबा, त्यांच्या शाहाणपणाचें आश्चर्य करण्यापेक्षां त्यांस असें चमत्कारिक साहजिक ज्ञान देणारा जो ईश्वर त्याच्या अपार शाहाणपणाचें आश्चर्य कर; कां कीं भूगोल विद्येची इतकी माहिती केवळ तर्कानें किंवा शिकूनहि व्हावयाची नाहीं अशा प्राण्यांस ती त्यानें दिल्ही.

रा०— खरेंच; पण आई, पक्ष्यांस पाहिजे असल्यास धृवापासून मध्यरेषेपर्यंत व्हावी तसी हवा सांपडेल, असें मला वाटतें.

आ०— वास्तविक; जर त्यांच्या मनांतून निरनिराळ्या ठिकाणीं प्रवास करावयाचा असला, किंवा स्थलांतर केल्यावर ज्या गांवीं ते जातात तिकडच्या जमीनींत कांहीं फेरफार झाल्यामुळें निघून जावयाचें पडलें तरी त्यांस पाहिजे तसी हवा सांपडायास फार अडचण पडणार नाहीं.

रा०— जमीनींत फेरफार झाला तर त्यांच्या प्रवासासीं काय संबंध आहे तो मला बरोबर समजत नाहीं.

आ०— मुला, वारंवार असें पाहण्यांत आलें आहे कीं, ओसाड जमीनीची लागवड करूं लागले ह्मणजे तेथें पूर्वीं कधीं आले नसतील असे पक्षी येतात; ते कशासाठीं ह्मणसील तर तिकडे तरतऱ्हेचे कीटक व वनस्पती उत्पन्न होतात त्या खावयास; याचप्रमाणें एखाद्या ठिकाणीं मोठी लढाई झाली किंवा रोग उठला ह्मणजे नवे नवेच पक्षी दृष्टीस पडूं लागतात. एक प्राचीन ग्रंथकार असें लिहितो कीं, एशा खंडाच्या हद्दीवर थ्रेशियन बासफरस ह्मणून समुद्रधुनी आहे ती उलंघून युरोप खंडाकडे जातांना एकदां म्या ससाणे, घारी, कुरर, आणि गीध यांचीं लष्करेंचीं लष्करें पाहिलीं.

रा०— तीं एवढीं कशाकरितां गेलीं असतील?

आ०— ह्या सर्व पक्ष्यांस जनावरांचें कुजलेलें मांस खावयास आवडतें ह्मणून त्या काळीं कांहीं जनावरें किंवा मनुष्यें विशेष मेलीं असावीं त्यांचें मांस खाण्याच्या लोभानें ते गेले असतील.

रा०— पक्षी स्थलांतर करतांना किती त्वरित उडत असतात?

आ०— कांहीं पक्षी दर तासास पन्नास कोस उडून जातात. इडर व बदक तितक्याच वेळांत पंचेचाळीस कोस आणि ससाणा पाऊणशें कोस चालून जातो. दुसरे पक्षी आपआपल्या आकृतीप्रमाणें कमजास्त चालत असतात.

रा०— आहा! केवढी त्वरा ही!

आ०— आणि पक्ष्यांचें वजन व पाखांची लांबी जसी असेल तसा त्यांचा वेग निरनिराळा असतो. पाहा गोवी पक्षी फार त्व-

आहेत.

**रा०**— सारस हा प्रवास करणारा पक्षी आहे काय?

**आ०**— होय, हा पूर्वीं पासून नियमीत काळीं प्रवास करतांना पाहिला आहे. परंतु हरकारा ह्मणून एका जातीचें खबुतर असतें त्याच्या सारिखी उडण्याची चपळता कदाचित दुसऱ्या कोठ्याच पक्ष्यास नसेल आणि त्याची मार्ग क्रमण्याची असी कांहीं खुबी आहे कीं त्याचे डोळे बांधून त्याला चाळीस पन्नास कोस



सारस.

दूर नेलें तथापि तेथून तें अचूक आपल्या ठिकाणीं थोडक्याच वेळांत परत येतें.

**रा०**— तुझ्या मतें, किती लवकर येईल?

**आ०**— एशा व युरोप खंडांतील तूर्कस्थान देशांत जासुदांचें काम बहुतकरून याच पक्ष्याकडून करवितात, आणि पाहा आलेपोपासून बाबिलन नामक शहरास जावयास मनुष्याला तीस दिवस लागतात परंतु हा जासूद तितकी मजल अठ्ठेचाळीस तासांत खेटून टाकतो.



रा०— किती पराकाष्ठेची त्वरा ही! पण आपलीं घरचीं खबुतरें इतकीं त्वरेनें किंवा इतकीं दूरहि उडत नसतात.

आ०— माझ्या मुला, हीं एक ध्यानांत धरण्याजोगी गोष्ट आहे कीं, हे बहुतेक स्थलांतर करणारे पक्षी परस्थळीं जाऊन एकदां उतरले ह्मणजे फारसे दूर हिंडायाला जात नाहींत. एका जागेंत राहतात.

रा०— काय चमत्कार; आई, यावरून कोणाला वाटेल कीं, त्यानी इतक्या लांब प्रवासास निघण्याच्या पूर्वीं थोडासा उडण्याचा अभ्यास करावा हें बरें.

आ०— होय मुला, पक्ष्यांसहि तसेंच वाटतें; कांकीं प्रवासास निघायाच्या पूर्वीं महिना दीड महिना ते सर्व एकाद्या मैदानांत किंवा उंच टेकडीवर एकत्र जमून आकाशांत आडवे तिडवे फेरे करीत असतात आणि जसे काय राज्य प्रकरणींच खलबत करीत आहेत तसे शब्द करूं लागतात. कांहीं जातीचे मासेहि स्थलांतर करीत असतात हो.

रा०— खरेंच काय आई! मला वाटतें ते पोहत पोहत जात असतील.

आ०— दर वर्षास आषाढ व श्रावण मासीं मुंबई बंदरांत बोंबील फार गोळा होतात हें त्वां ऐकिलें असेलच.

रा०— होय; परंतु ते इतके कोठून येतात?

आ०— समुद्राच्या खोल पाण्यांतून.

रा०— पण आई; ते कशासाठीं येतात?

आ०— आपलीं आंडी ठेवण्यासाठीं ते कांठाकडे येतात; परंतु कोळी लोक असें समजतात कीं, परम दयाळु ईश्वर गरीब गुरीबासाठीं हा भक्ष्य पाठवून देतो ह्मणून ते त्यांस जाळ्यांत धरितात आणि पाट्याच्या पाट्या भरून बाजारांत विकायास नेतात. कोठकोठच्या बंदरांत इतके मिळतात कीं ते लोक त्यांस सुकवून वर्षभर खातात आणि याशिवाय त्यांचा व्यापार करितात.

रा०— मोठी मौज; खचीत ईश्वरच त्यांस पाठवीत असेल.

येऊं लागतात तेव्हां गरीब गुरीब लोकांस फारच आनंद वाटतो.

**रा०**— याप्रमाणें दुसरी कांहीं मासळी येती?

**आ०**— गोळी, सरंगे, हलवे, पाले हेंहि उदाणा उदाणाला पुष्कळ येतात. चिवणी, वडसी, डाकु, टिचाणी आणि दुसरे कांहीं समुद्रांतले खारे मासे स्थलांतर करून नदींत जातात तेव्हां तिकडचे लोक त्यांस धरून खातात.



मऊर मासा.

**रा०**— आई, उडणें आणि पोहणें हे प्रवास करण्याचे दोन्ही मार्ग फार सोपे दिसतात. बरें कांहीं चालणारीं जनावरें स्थलांतर करितात?

**आ०**— होय, अमेरिका खंडाजवळ वेस्तइंदीज ह्मणून बेटें आहेत तेथील एका प्रकारच्या खेंकड्याविषयीं म्या चमत्कारिक वृत्तांत वाचले आहेत.

**रा०**— ते मला सांगसील?

**आ०**— ऐक मुला, तीं खेकडीं त्या बेटांतील पर्वतांत राहतात, परंतु आपलीं आंडीं समुद्रांत नेऊन ठेवतात; प्रवासास निघतात तेव्हां तीं वांकडी तिकडी जात नाहींत, नीट एका मार्गानें जातात; त्यांच्या चालण्याच्या सारखेपणाची इतकी खुबी आहे कीं कोणी ह्मणेल एकाद्या विद्वान गणीत्यानेच त्यांस मार्गाची सरळरेष पाडून दिल्ही आहे.



रा०— बरें कधीं तीं भिंतींजवळ किंवा घराजवळ आलीं तर?

आ०— अंः अशा अडथळ्याची ते पर्वा करीत नाहींत, त्यांवर खुशाल चढून जातात. तीं इतकीं दाटीने चालतात कीं जसा काय जमीनीवर एक पडदाच टाकला आहे; त्यांच्या कंवट्याचा नाद तरी विलक्षणच निघतो.

रा०— बरें मार्गांत एकादा ओहोळ आडवा आला तर त्यावरून तीं पोहून जातील?



जमीनीवरचीं खेकडीं प्रवास करितात.

आ०— नाहीं; त्यांस पोहतां येत नाहीं ह्मणून त्यांस नदीच मोठाच अडथळा आहे; तिचा पाट अरुंद किंवा चालून जाण्याजोगा उथळ सांपडेपर्यंत त्यांस तिच्या काठावरून पांच पंचवीस कोस चालून जावें लागतें.

रा०— तीं समुद्र तिरीं कोठपर्यंत राहतात?

**आ०**— सुमारें दीड महिना; नंतर जसीं तीं व्यवस्थेने सरळ गेलीं होतीं तसींच व्यवस्थेने आपल्या पूर्वस्थळीं परत येतात.

**रा०**— वास्तविक, जनावरें फार उद्योगी असतात. माझी खातरी झाली आई.

**आ०**— पण मी तुला टोळांविषयीं सांगायास विसरलें, त्यांची धाड जेव्हां कां एकाद्या देशावर येती तेव्हां ते धान्याची किंवा बागाईताची अगदी नासाडी करून टाकितात, ह्मणून टोळांच्या स्थळांतराविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "तो एक देशांत माहमारीचा रोगच येतो."

**रा०**— आहा! बाबाला ज्यान काकाचें तुर्कस्थानाहून पत्र आलें होतें त्यांत टोळानी त्याच्या बागाची अगदी नासाडी करून टाकली ह्मणून तो किती कष्टी होत होता.

**आ०**— ते मोठे खादाड प्राणी आहेत असें सर्व ग्रंथकारांचें मत आहे; केवळ वनस्पतीच खातात असें नाहीं तर कुणबी लोकांची उन्हांत वाळत घातलेली कांबळी देखील खाऊन टाकतात. वास्तविक एकदां असें झालें कीं एका खेडे गांवांतल्या देवळांत ह्या टोळांची धाड शिरून त्यानी तेथें नाना तऱ्हेचे रेशमी पोषाक होते ते सर्व खाऊन फडशा केले, बरें इतकेंहि करून देव्हाऱ्याला व दरवाज्याला चांगला रंग लावला होता तोहि खाऊन टाकला.

**रा०**— काय तरी खादाड प्राणी! आई, ते उडतात तसें त्यांस चालतां येतें?

**आ०**— मुला, त्यांस दोन्ही रितीने प्रवास करितां येतो. भक्ष्य शोधायास ते जमीनीवर उतरतात तेव्हां इतके जवळ जवळ चालतात कीं कोणाच्या मनांत येइल कीं एक काळी सत्रंजीच चालत आहे. जेव्हां तुझ्या ज्यान काकाला पहिल्याने या प्राण्यांची टोळी भेटली तेव्हां ते किती लवकर खातात हें पाहावयासाठीं त्याने त्यांमध्यें एक भाकर उडविली.

**रा०**— मग त्यानी ती लागलीच खाऊन टाकली असेल ना!

**आ०**— क्षणांत नाहींसी करून टाकली.

**रा०**— ओहो, तर त्यांच्या किती टोळ्याच्या टोळ्या असतील!

आ०— इतक्या कीं जेव्हां ते उडून गेले तेव्हां एकादें ढग येऊन काळोख पडतो तसा कांहीं वेळ अंधार पडला होता आणि त्यांच्या पाखांचा आवाज मोठ मोठ्या वृक्षाच्या पानासारिखा येऊं लागला.

रा०— ते कधीं समुद्रावर उड्डान करितात?

आ०— कधीं कधीं ते तसें करायास जातात परंतु त्यांस विसावा घ्यावयास मिळत नाहीं ह्मणून ते बुडून मरून जातात.

रा०— तर फार चांगलें. मला वाटतें त्यांचा कांहीं भक्ष पाण्याजवळ नेऊन ठेवावा आणि त्यांस तेथें लालूच दाखवून न्यावें.

आ०— परंतु जेथें ते मरून कुजतात तेथें पराकाष्ठेची दुर्गंधी सुटती आणि त्यापासून कदाचित भयंकर रोग उत्पन्न होतात. हे मोठे नाशकारक प्राणी आहेत, ह्यानी पृथ्वींतील सुंदर सुंदर बागांची नासाडी करून टाकली आहे; हे नवें आलेलें धान्य खातात इतकेंच नाहीं इतर झाडें व वनस्पतीचा असा कांहीं नाश करून टाकतात कीं दोन तीन वर्षेपर्यंत तीं अगदीं करपून गेल्यासारिखीं दिसतात.

रा०— तर हीं असीं भयंकर स्थलांतरें करण्यांत कोणता हेतू असेल?

आ०— शोधकांस याचा अजून पक्का थांग लागला नाहीं; हे प्राणी कोणत्या उद्देशाने प्रवासास निघत असतील ते निघोत परंतु यांपासून लोकांची फारच नुकसानी होती.

रा०— आई, मधमाशा स्थलांतर करीत नाहींत?

आ०— जेव्हां त्यांचें पोळें मधीने पूर्ण भरून जातें तेव्हां त्या तिकडून उडून जातात; आणि ज्या अर्थी त्या आपल्या पूर्व स्थळीं परत येत नाहींत त्या अर्थी त्या दुसऱ्या कोठें तरी जाऊन वस्ती करीत असतील ह्मणून त्याहि स्थलांतर करितात असें ह्मटल्यास चिंता नाहीं.

रा०— वा! प्रवास करण्यांत फार मौज आहे. जर मी पक्षी झालों तर गोवी पक्ष्यासारिखा स्थलांतर करणारा होईन, मात्र एकाच ठिकाणीं जावयाचें आवडणार नाहीं.

आ०— जेवढे मी तुला स्थलांतर करणारे पक्षी सांगितले तेवढे सर्व कांहीं तरी उद्देशाने प्रवासास निघतात.

रा०— पण आई, टोळांस कांहीं अगत्याचें काम आहे असें दिसत नाहीं.

आ०— मुला! ईश्वरी क्षोभाने हें दुश्चिन्ह आपणांवर येतें असें मानलें तर ते टोळ योग्य काळीं येऊन आपलें काम बजावतात तें ठीकच आहे; परंतु सारस, पारवा, आपला प्रवासास जाण्याचा वेळ बरोबर समजला तर त्याविषयीं आपणास आश्चर्य वाटूं नये.

रा०— आई, कार्याशिवाय नुसताच प्रवास केला तर त्यापासून कांहीं फायदा होईल कीं नाहीं?

आ०— होय पुष्कळ होईल; आपल्या शरिरास आरोग्यता व बळकटी येईल व ज्ञानहि पुष्कळ वाढेल, ह्मणून ज्या सत्पुरुषांस वारंवार देशांतर करावयाचें अनुकूळ असेल त्यानी सृष्टिची रचना पाहून आनंदभरित होत्सातां देवाचे गुणानुवाद लोकांस सांगत जावें, ह्मणजे तेणेंकरून दुसरेहि लोक त्यांसारिखे सत्पुरूष होऊन ईश्वर भक्तीस लागतील.



# प्रकरण ६.

---

हिंवाळ्यांतील मुकाम किंवा हिमनिद्रा.

पावसाळा सरल्यानंतर एका दिवशीं राबट हा शेतांत फिरायास गेला होता, तो तेथून परतल्यावर आईस कांहीं प्रश्न करावे ह्मणून तिजकडे मोठ्या उत्कंठेने धांवत चालला तों मार्गांत त्याने एक पाण्याचें कुंड पाहिलें, त्यांत कांहीं बेडूक एका कोपऱ्यांत छायेखालीं उगीच बसले होते व कांहीं पाण्यांत खालीवर गचकळ्या खात होते. त्यावरून त्याला आठवण झाली कीं पावसाळा लागतांना आपल्या बागेंत जे इतके बेडूक होते ते सर्व आतां नाहींसे झाले याचें कारण काय असेल तें आईस पुसावें ह्मणून त्याने घरीं येण्याची मोठी त्वरा केली.

**राबट.**— आई, मृगाचा पाऊस पडल्यावर मोठाले पिवळे बेडूक डुरडूर डरांव डरांव करीत होते त्याची तुला आठवण आहे? ते कसे पिवळे पिवळे धमक मोठ्याने ओरडत होते.

**आई.**— होय माझ्या मुला, मला त्याची आठवण आहे, त्यांनी पहिल्या रात्रीं तर इतका गोंगाट केला कीं मला अगदीं झोंप लागली नाहीं.

**रा०**— पण आतां ते कोठें गेले? फार दिवस झाले त्यांतला एकहि माझ्या दृष्टीस पडत नाहीं.

**आ०**— पण मुला, ते कोठून आले होते तें तुझ्याने सांगवेल. उन्हाळ्यांत तर एकहि दिसत नाहीं हें तुला ठाऊक असेलच.

**रा०**— तें माझ्याने सांगवत नाहीं, कित्येक लोक असें ह्मणतात कीं पावसाळ्यांत ते आकाशांतून पडतात परंतु तें मला खरें वाटत नाहीं.

**आ०**— छी, ते ढगांत किंवा हवेंत राहतील तरी कसे, कां कीं त्यांतले कित्येक तीन तीन शेर भारी असतात. पुनः एकदा तूंच विचार करून पाहा ह्मणजे ते कोठून येतात तें कदाचित तुला समजेल.

**रा०**— तर मग जमिनींतूनच निघत असतील. कां कीं ते बागांत आणि शेतांत फार आढळतात.

**आ०**— ठीक तसेंच मुला, पावसाळा गेल्यावर पाणी नाहींसें होतें तेव्हां ते जमिनींत बिळें करून ओलावा सांपडेल तेथें असतात.

**रा०**— तेथें ते बसून राहतात?

**आ०**— नाहीं, ते निजतात. पावसाचें पाणी त्यांच्या बिळांत जाऊन त्यांस जागे करीपर्यंत ते सतत साहा महिने तसेच निजून राहतात. मग पाऊस पडून जिकडे तिकडे पाणी सांचतें तेव्हां बाहेर येऊन ते फार खुशाल होतात आणि आपल्या गायनाचा घोष करूं लागतात.

**रा०**— साहा महिने झोंप! केवढी सुस्ती ही!

**आ०**— होय, आपणास ती सुस्ती वाटती; परंतु ईश्वरानें अशा स्वभावाचे पुष्कळ प्राणी केले आहेत. याप्रमाणें गोगलगाया निजलेल्या त्वां पाहिल्या नाहींस?

**रा०**— होय, म्या आज कांहीं गोळा केल्या आहेत त्यांचीं द्वारें बारीक कवचीनें बंद आहेत त्यावरून मला वाटतें त्या निजल्या असतील.

**आ०**— पावसाळ्यांत पुष्कळ मोठमोठ्या गोगलगाया शेतांत रांगत असतात आणि चार व दुसरे कांहीं हिरवे पदार्थ खातात, परंतु सांचलेलें पाणी सुकून जातें तेव्हां त्या जमिनींत शिरतात आणि पुनः पाऊस लागून त्यांच्या बिळांत पाणी जाई तोंपर्यंत निजून राहतात. म्या असें ऐकिलें आहे कीं कित्येक गोगलगाया विलायत व अमेरिकादेशांत कोणी पाठविल्या होत्या त्या तेथें पोहंचल्यावर जाग्या झाल्या.

**रा०**— हो हो, तर त्या मोठ्या प्रवासी होत्या! परंतु मी

जर इतका प्रवास करीन तर सारा मार्ग असा निजून राहणार नाहीं.

**आ०**— विलायतेंत हिंवाळा आला ह्मणजे कासव, रानडुकरें, चामडेल, मधमाशा, खारी, व याखेरीज पुष्कळ जनावरें असींच निजून राहतात.

**रा०**— पण आई, इतका काळ त्यांस अन्न कोठून मिळत असेल?

**आ०**— खार, रानउंदीर, मधमाशी, आणि थंड देशांत हिंवाळाभर निजणारीं सर्व जनावरें यांस इतर जनावराप्रमाणें जो भक्ष पाहिजे तो सांठवून ठेवायास त्यांचा उत्पन्नकर्ता ईश्वर त्यांस शिकवितो; मग त्यांस भूक लागती तेव्हां ते जागे होतात आणि लागेल तेवढें खाऊन पुनः निजतात.

**रा०**— मधमाशाच्या पोळ्यांतून मध काढून त्यांत कांहीं राखून ठेवितात तें याचसाठीं काय?

**आ०**— होय त्याचसाठीं; कां कीं असें न केलें तर वसंतऋतूंत तितकीं फुलें येऊन त्यांत मध होईपर्यंत गरीब बिचाऱ्या मधमाशांस कांहींच खावयास मिळणार नाहीं. पाहा बर्फ निघून गेलें ह्मणजे उन्हाळ्याच्या पहिल्याच दिवसापासून मधमाशा व इंद्रकीट जागे होऊन लागलेच नव्या आलेल्या मोहराच्या आसपास उडूं लागतात व रांगतात.

**रा०**— आई, मी ते पुष्कळदां नीट लक्ष लावून पाहिले, परंतु इतके लवकर कसे वाढतात हें पाहून आश्चर्य वाटे, कां कीं मी असें समजत होतों कीं प्रति वर्षी वसंतऋतूंत सर्व कीटक नवेच उत्पन्न होतात.

**आ०**— नवे पुष्कळ होतात; परंतु कित्येक तीन किंवा चार वर्षेपर्यंतहि जिवंत राहतात.

**रा०** आई, ही निजण्याची सवई किती विलक्षण आहे! तुला काय वाटतें, त्या प्राण्यांस इतकी लांब झोंप पाहिजे असेल?

**आ०**— नाहीं, मला वाटतें त्याचें कारण निराळें आहे; कां कीं कित्येक जनावरें जीं आपल्या देशांत अशा प्रकारची हिमनिद्रा

घेणारीं आहेत त्यांस उष्ण देशांत नेलीं तर तीं रात्रीशिवाय अगदीं निजत नाहींत. रानझिल्ली जंगलांत असती तेव्हां तिला हिंवाळा आला म्हणजे लांब झोंप घ्यावी लागती परंतु गांवांत असली तर चुलीजवळ राहून हिंवाळाभर मोठ्या आनंदाने कीर्र करीत बसती. तर मुला, हिंवाळ्यांत ह्या प्राण्यांस बरोबर अन्न मिळणार नाहीं व ते उघड्यावर राहिले तर मरून जातील म्हणून कृपाळू ईश्वराने त्यांसाठीं हिंवाळ्याच्या झोंपेची तजविज करून ठेविली आहे असें दिसतें.

**रा०**— आई, हे प्राणी जमिनींत इतके खोल पुरलेले असतात तरी त्यांस अमुकच वेळीं जागें व्हावयाचें कसें समजतें?

**आ०**— त्यांस हें चमत्कारिक ज्ञान स्वभाविक आहे; तेणेकरून अन्न सांठवून ठेवायाचें व जसें समजतें तसें उष्णकाळ येतो आणि झाडावर कळ्या फुलतात किंवा पाऊस पडून त्यांच्या उदर निर्वाहाच्या वस्तु तयार होतात तेव्हां कोणी न सांगतां त्यांस आपोआप जागें व्हावयाचें कळतें.

**रा०**— बरें, गोगलगाय किंवा रानउंदीर यास अशा हिंवाळ्याच्या झोंपेंतून कोणी उबेंत नेऊन ठेविलें तर तो लवकर जागा होईल कीं नाहीं?

**आ०**— जे प्राणी मनुष्याच्या हातचा चारा खातात त्यांस तसें करून पाहिलें तेव्हां ते आपली हिंवाळ्याची झोंप सोडून चांगले सुखरूप राहतात असे दिसले.

**रा०**— आणि ते थंडींत फार वेळ ठेविले तर मरतील किंवा निजलेलेच राहतील?

**आ०**— प्रिय मुला, त्याविषयीं असी एक चमत्कारिक गोष्ट सांगतात कीं गोगलगाया सुकवून त्या पंधरा वर्षें थंड देशांत नेऊन ठेविल्या होत्या.

**रा०**— खरेंच काय? आणि त्या इतका काळ जिवंत राहिल्या?

**आ०**— होय; नंतर जेव्हां त्यांस ऊन पाण्यांत भिजविलें तेव्हां त्या आपल्या झोंपेंतून जाग्या होऊन टवटवित आणि हुशार दिसूं लागल्या. चामडेलहि फार वर्षें वांचतात; जेथें कांहीं खाव-

यास नाहीं किंवा वायूचा प्रवेशहि होणार नाहीं अशा ठिकाणीं ते सुस्त पडलेले परंतु जिवंत सांपडलेले आहेत.

**रा०**— आई, अशा कोणत्या ठिकाणीं सांपडले?

**आ०**— झाडांच्या बुंदांच्या मध्यभागांत आणि दगडांतहि.

**रा०**— बये, ते तेथें कसें गेले असतील?

**आ०**— त्याविषयीं पदार्थविज्ञानी चांगला विचार करून असी कल्पना करितात कीं ते प्राणी तेथें हिंवाळ्यांत जाऊन राहिले असतील, मग वसंतऋतूंत मोठे झाल्यावर त्यांच्यानें बाहेर पडवलें नसेल, अथवा झाड वाढल्यामुळें किंवा दगड कठीण होत गेल्यामुळें ते आंतच अडकून राहिले असतील.

**रा०**— बहुतकरून तसेंच असेल; परंतु चौफेर बंद असून आंत जिवंत कसे राहिले असतील?

**आ०**— याविषयीं सर्वांची मति कुंठित होती आणि या आश्चर्यकारक हिमनिद्रेशिवाय दुसरें कांहींच कारण दिसत नाहीं. अशा स्थितींत गोगलगायासारिखे फार वर्षें वांचणारे दुसरे कोणतेहि प्राणी दिसत नाहींत, त्यांस तसाच कांहीं अपाय होतो तेव्हां त्या मरतात.

**रा०**— हे प्राणी हिमनिद्रेंत असतां त्यावर एकादे गुंग करणाऱ्या विषाचा प्रयोग केला तर ते मरतील कीं नाहीं?

**आ०**— वैद्यक जाणणाऱ्यांचें मत असें आहे कीं कोणतेहि प्राणी तशा स्थितींत असले तरी त्यांवर सर्व विषें लागू पडतील, त्यांचा अमल मात्र तितका लवकर बसणार नाहीं, कां कीं कशाहि औषधीचा प्रयोग चालविला तरी झोंपेमुळें त्यास अडथळा होतो.

**रा०**— आई, या रितीनें आयुष्य घालविणें ह्मटलें ह्मणजे फार कंटाळवाणें दिसतें. चामडेलासारिखे कोंडलेले राहून खाण्यापिण्यास कांहींच न मिळालें तर मला इतका काळ जिवंत राहणें अगदीं आवडणार नाहीं.

**आ०**— राबट, आपण विवेकी प्राणी आहों यास्तव आपणास तसें राहावयास निःसंशय आवडणार नाहीं.

**रा०**— आई, हे बंदींत राहिलेले चामडेल जागे झाल्यावर

दुसऱ्या चामडेलांसीं ताडून पाहिले तर म्हातारे किंवा तरणे दिसतील?

आ०— बहुतकरून ते मोठे वाढलेले दिसतील, आणि मुलांत फार जर्जर अशक्त व थकलेले असतात आणि त्या त्रासदायक बंदींतून सुटल्यावर ते फार दिवस वांचत नाहींत.

रा०— आई, कासव आणि चामडेल त्यांच्या स्वभाविक स्थितींत किती वर्षें वांचतात?

आ०— दीर्घायुष्याविषयीं त्यांची विशेष प्रसिद्धि आहे. म्या एक कासव पाहिला तो सत्तर वर्षांचा म्हातारा होता.

रा०— मला वाटतें, कदाचित या हिमनिद्रेच्या विश्रांतीने त्यांचें आयुष्य वाढत असेल.

आ०— होय वाढतें, कां कीं हिंवाळ्याची निद्रा त्यांस कधीं न मिळाली तर कांहीं दिसण्यांत येण्याजोगा त्यांस अपकार होत नाहीं तथापि वारंवार असें होऊं लागलें तर खचित त्यांचें आयुष्य कमी होईल.

रा०— चामडेल कोठपर्यंत वाचतात तें तुला ठाऊक आहे.

आ०— एका गृहस्थाने एक चामडेल छत्तीस वर्षेंपर्यंत बाळगला होता, त्याचा वृत्तांत म्या कालच वाचला, तेव्हां मला फार मौज वाटली. तो त्याच्या बापाजवळ पूर्वीं पुष्कळ वर्षें होता त्यावरून त्यास "वडील बेडूक" म्हणत असत. तो अगदी माणसाळून गेला होता तथापि त्याच्या वर्तणुकीवरून तो मोठा धूर्त दिसे.

रा०— तोहि दर हिंवाळ्यांत निजून राहत असेल ना?

आ०— होय, प्रतिवर्षी हिंवाळा लागला म्हणजे तो अदृश्य होई आणि उन्हाळा आला म्हणजे पुन्हा परत येई.

रा०— तो कोठें जाई त्याची तो गृहस्थ चौकसी करी?

आ०— होय, हा चामडेल सुकासा एक बांध पाहून त्यांत हिमनिद्रा करीत असे असें प्रथम त्या गृहस्थाला समजलें; पुढें त्याने आपल्या बागेंत नव्या दगडी पायऱ्या बसविल्या आणि त्यांस कांहीं छिद्रें करवून प्रत्येक पायरीखालीं दीड गज लांबीची पोकळी

ठेविली तेव्हांपासून त्या बेडकानें त्यांत खुशीनें जाऊन राहावें आणि उन्हाळा आला ह्मणजे एकाद्या छिद्रांतून बाहेर पडावें. एकदां डोमकावळ्यानें त्यावर झडप घालून त्याचा डोळा फोडला आणि इतका बोंचून घेतला कीं त्या वेदनेनें एक वर्ष दुखण्यांत पडून तो शेवटीं त्या अपायानें मरण पावला.

**रा०**— गरीब बापडा! आई, याप्रमाणें कांहीं पक्षीहि निजत असतील?

**आ०**— प्राचीन काळचे व हल्लींचे पुष्कळ पदार्थविज्ञानी निश्चयपूर्वक सांगतात कीं विलायतेंतील गोंवीं हिंवाळ्यांत थंडीच्या कहरामुळें देशांतरास जातात, तेव्हां त्यांचीं लहान पिल्लीं जीं त्यां-जबरोबर उडायास शक्तिमान नसतात तीं पहिल्या वर्षी हिमनिद्रेंत तसींच राहतात.

**रा०**— राहत असतील, पण आई, पदार्थविज्ञान्याची खातरी होण्याकरितां कोणी त्यांस निजलेलें पाहिलें आहे?

**आ०**— होय, इंग्लंड देशाच्या दक्षिण किनाऱ्यावर गुहा आहेत त्यांत, व फ्लिंटशीर परगण्यांतील निकामी झालेल्या खाणींत शेंकडों गोंवी गाढ निजलेल्या सांपडल्या होत्या त्यांतून कांहीं उष्ण हवेंत नेल्यावर जागृत झाल्या आणि हीं सर्व लहान होतीं असें सांगतात, तर त्यावरून मी जें कांहीं वर ह्मटलें तें वास्तविक आहे असें दिसतें.

**रा०**— बरें ऐन हिंवाळ्यांत कांहीं दिवस गरमी करूं लागती तेव्हां ते पक्षी जागे होत असतील कीं नाहीं?

**आ०**— प्रिय मुला, असें होतें तेव्हां पुष्कळ जागे होऊन बाहेर पडतात; परंतु थंडी लागूं लागली ह्मणजे पुन्हा गुप्त होतात.

**रा०**— कांहीं गुहा अवचित सांपडल्या होत्या, त्यांतील सुस्त निजलेल्या प्राण्याविषयीं बाबानें तुला कांहीं वाचून दाखविलें त्याची मला आठवण आहे.

**आ०**— मिसर देशांत प्रवासी गेले होते, ते थडग्यांत शोध करीत असतां तेथें वागळें होतीं व उडूं लागलीं त्यांविषयीं तूं विचार करितोस असें मला वाटतें.

रा०— हो हो! त्याचविषयीं.

आ०— विलायतेंत वागळें हिंवाळाभर निजतात आणि वसंतऋतू येतो तेव्हां जागृत होऊन संध्याकाळच्या रम्य वेळीं कीटक धरायास बाहेर पडतात; निजतांना तीं आपले आकड्यासारिखे पाय एकाद्या सुक्या छपराला अडकवून आपलें शरीर आपल्या चांबड्याच्या पाखानें झांकीत असतात.

रा०— आई, सापांस फार निजायास पाहिजे? कां कीं जेव्हां जेव्हां मी मृगशाळेंत जातों तेव्हां तेव्हां ते निजलेलेच पाहतों.



वाघूळ.

आ०— नेहमीं गुंग राहणारीं असीं पुष्कळ जातीचीं किडीं असतात विशेषेंकरून साप. वास्तविक, अजगरासारिख्या मोठ्या जाती आहेत त्या चारा खातेवेळीं मात्र जाग्या होतात; आणि उन्हाळा असो किंवा हिंवाळा असो त्यांची क्षुधा तृप्त झाली ह्मणजे लागलेच ते झोंपीं जातात.

रा०— होय, ह्मणूनच वाटतें त्या मृगशाळेंत अजगराचा रखवालदार ह्मणत होता कीं हा आतां चारा खाऊन निजेल तो पुनः चारा खावयाची वेळ होईपर्यंत उठणार नाहीं.

**आ०**— खरेंच, त्यास महिन्यांतून एकदां चारीत तरी तो जिवंत होता कां कीं त्याचा श्वासोश्वास चाले तो आह्मी पाहत असूं.

**रा०**— आई, ते जंगलांत सुटे असतात तेव्हांहि असाच महिन्यांतून एकदां चारा खातात.

**आ०**— ज्याहीं त्यांची स्थिती पाहिली आहे व त्या प्राण्याविषयीं पक्का शोध केला आहे ते असें सांगतात कीं त्यांस पुष्कळ काळ उपास काढण्याची शक्ति आहे; परंतु जर त्यांस फारच उपास पडला तर ते क्रूर होत जातात, इतके कीं इतर जनावरें त्यांचे तेष पाहून त्यांस थरथरा कांपूं लागतात. असे भयंकर प्राण्यास मारायाचें असलें तर ते निजले असतील तेव्हां सहज मारून टाकावें. असींच घड्याल, मगर, पाली, चोपई, सरडे, घोरपड, आणि या जातीचीं दुसरीं जनावरें थंड देशीं हिंवाळ्यांत निजत असतात.

**रा०**— आई, काय, ही विलक्षण विचित्र झोंप! याप्रमाणें मनुष्यें कधीं हिंवाळ्यांत निजतात?

**आ०**— नाहीं माझ्या बा; कित्येक मनुष्यानी कांहीं दिवस, आठवडे, आणि महिनेहि झोंपेंत घालविले आहेत तथापि ते कांहीं त्या कारणाने नाहीं, आजारामुळें, आणि तशांतून जागें करावें तर त्यांस हुशारी न राहतां अगदीं ग्लानी चढती. मनुष्यास मृत्युची थोरली झोंप येई तोंपर्यंत शरीराचा श्रम उतरायास अल्प निद्रा पुरे होती.

**रा०**— आई, मृत्युस आपण निद्राच समजलों तर तो तितका भयंकर दिसणार नाहीं.

**आ०**— ज्यांचा ईश्वरावर पूर्ण भरवसा आहे ते त्याच्या कृपेने मृत्युच्या बोलावण्यास अगदीं भीत नाहींत. वास्तविक अशा विश्वासु मनुष्यांस, मृत्यु निद्रेसारिखा शांत वाटतो. लाजरस नामें कोणी एका महान भक्तास ईश्वराज्ञा झाली तेव्हां तो झोंपीं गेला असें ह्मटलें आहे. तसाच स्तेफानस नामें दुसरा एक भक्त

होता त्यास दगडाचा भडमार करून मारून टाकिलें त्या प्रसंगीं-हि तो झोंपी गेला असें ह्मटलें आहे.

**रा०**— आहा! आई किती गोड हें?

**आ०**— ईश्वराच्या गुणानुवादासारिखें दुसरें काय गोड आहे. मुला, त्याच्या सन्निध जाऊन राहण्याची आपणास जेव्हां योग्यता येईल तेव्हां रात्रीं झोंपेस जाण्याचा व दिवसास उठण्याच्या खट-पटींतून व याशिवाय दुसऱ्या सर्व दुःखांतून मुक्त होऊन आपण सदासर्वकाळ आनंदमय राहूं.



# प्रकरण ७.

---

रेशमी किड्याचा शिक्षक; अथवा साहजिक बुद्धि आणि तिचे शिष्य.

राबटाचीं आईबापें आपल्या मुलांस जनावरें पाळूं देत नसत, कारण त्यांस असें वाटे कीं कोणत्याहि माण्यास परतंत्र करणें आणि त्यांस पाहिजे तेथें जाऊं न देणें हा मोठा क्रूरपणा होय; परंतु प्रसंगोपात घायाळ झालेला एकादा पक्षी किंवा मांजराचें अर्ध मेलेलें पिलें कोठें पडलेलें सांपडलें तर त्याची ममता करून तें बरें होऊन आपल्या पायीं निघून जाई तोंपर्यंत त्याचें चांगलें रक्षण करीत.

एका वसंत ऋतूंत राबट यास त्याच्या मित्रानें कित्येक रेशमी किड्यांचीं आंडीं नजर केलीं, तीं घेऊन तो आपल्या आईबापांस दाखवयास गेला तेव्हां ते ह्मणाले, बाबा, रेशमी किड्यांच्या स्थिती कशा कशा पालटतात त्याविषयींचा चमत्कार तूं आपल्या लहान पुस्तकांत नुसता वाचलास पण तो आतां प्रत्यक्ष पाहावयाचा असल्यास त्यांचा चांगला संभाळ कर. याप्रमाणें त्यास आईबापांची आज्ञा मिळाल्यावर त्याला फार हर्ष झाला. ते काळ्या रंगाचे लहान किडे पहिल्यानें आपल्या कवचा फोडून बाहेर आले तेव्हां हा त्यांस तुतीचीं पानें चारूं लागला, मग दिवसानुदिवस अधिकाधिक खात गेल्यावर ते चांगले पुष्ट झाले.

एक दिवस सकाळीं त्यांतले कित्येक किडे अगदीं निचेतन पडले आहेत आणि आदल्या दिवसीं संध्याकाळीं चारा घातला होता त्यास शिवलेहि नाहींत असें पाहून राबटानें त्यांस ताजीं पानें आणून घातलीं, पण तींहि खाईनात. तेव्हां तो फार खिन्न झाला आणि ह्मणतो, त्यांस विष तर चढलें नसेल? असें बोलतो आहे इत-

त्यांत त्याची आई घरीं आली, तिला पाहून मोठ्याने ह्मणतो, "आहा! आई, या माझ्या रेशमी किड्यांस काय झालें? पाहा कसे ते आखडून कोणपड्यांत जाऊन बसले आहेत.

त्याची आई ह्मणाली, बाबा, आतां त्यांची ही स्थिती बदलून त्यांवर कोश येणार आहे, यास्तव ते रेशीम कांतण्याच्या तयारींत आहेत. त्यांस कागदाचा पुडका करून त्यांत ठेविसील तर फार चांगलें होईल. आतां ते आपले रेशमी घरोटे टांगून ठेवण्याकरितां एकादा गुप्त कोनपडा पाहत आहेत.

राबट याजवळ चमत्कारिक जिनसांनी भरलेली पेटी होती तिंतून त्याने एक कागद काढून दिल्हा, मग शुंडाकृती पुडके कसे करावे ते त्याच्या आईने करून दाखविले, नंतर प्रत्येकांत एक एक किडा घालून ते पुडके दोरीला टांगून ठेविले, आणि कांहीं दिवसपर्यंत त्यांस छेडूं नको असें सांगितलें.

**राबट**.— पण आई, रेशमी किड्यांस त्यांच्या घरोट्यासाठीं दोरे काढावयास कोण शिकवितो, आणि मजजवळ जे आहेत त्यांनी तर रेशीम कांततांना कधींच पाहिलें नाहीं.

**आई**.— मुला, ज्या शिक्षकाने तुझ्या क्षेम कुशलाच्या गोष्टी तुला शिकविल्या तोच त्यांस शिकवील.

**रा०**— पण आई, मला जें कांहीं ठाऊक आहे तें सर्व तूं आणि बाबाने मला शिकविलें.

**आ०**— खरें राबट, पण त्याशिवाय आंगबुद्धीने जें कांहीं तूं शिकलास तें सर्व आह्मी शिकवूं ह्मणतों तर तें कांहीं साधतें ना. त्या रेशमी किड्यांस साहजिक ज्ञानासारिखा दुसरा उत्कृष्ट शिक्षक कोणीच नाहीं.

**रा०**— आई, तूं वारंवार साहजिक बुद्धिविषयीं ह्मणतीस तर ती काय हें कृपाकरून मला सांगसील?

**आ०**— मुला, विवेकास अनुसरून नुसतां जनावरांच्या ठायीं कांहीं एक करण्याची प्रेरणा होत असती तिला साहजिक बुद्धि ह्मणतात.

रा०— तर मला वाटतें, साहजिक बुद्धि जनावरांसच असावी कां कीं त्यांस विवेक नाहीं.

आ०— जनावरांत साहजिक बुद्धि विशेषेंकरून दृष्टीस पडती, आणि मनुष्य विवेकी असून त्याला हाहि गुण आहे.

रा०— ह्या साहजिक बुद्धिगुणानें लोक वर्त्ततात; ते कसे?

आ० राबट, तुझ्या तान्ह्या भावाकडे आतां पाहा, तो काय करीत आहे तें!

रा०— तसें कांहीं सांगायाजोगतें करीत नाहीं; नुसता जमिनीवर रांगतो, आणि खुर्च्यांस धरून चालायास पाहत आहे.

आ० कांहीं महिन्यामागें तो असेंहि करीत नसे, परंतु आह्मी त्यास जेथें ठेवूं तेथें हालल्या चिलल्याशिवाय तसाच स्तब्ध राहत असे. चालावें कसें किंवा चालतांना दुसरे लोक आपले पाय एका मागून एक टाकतात कसें त्याविषयीं त्यानें विचार केला असेल असें तुला वाटतें?

रा०— छी! तितकें समजायास त्यास कोठेंच ज्ञान. पाहा मी त्यास बोलायास किंवा हातानें कांहीं करायास शिकवितों तर तो कांहींच समजत नाहीं.

आ०— मुला, त्याचे अवयव जसजसे सदृढ होत जातात तसतसे ते आंग बुद्धिनें हालवूं लागतो. पाहा ज्या वेळेस तो तान्हें बाळ होता त्या वेळेस त्याला पहिल्यानें अन्न खावयास कोणी शिकविलें?

रा०— कोण जाणे! त्यास पहिल्यानें जेवतांना म्या पाहिलें नाहीं.

आ०— तुझें उष्टावण झालें तेव्हां आणि त्याचें झालें तेव्हांहि मी नीट लक्ष लावून पाहत होतें, तुह्मी त्या प्रसंगीं इतके हुशार दिसलां कीं खाण्यापिण्याच्या कामांत तुह्मास कोणीतरी चांगला उपदेश केला असावा.

रा०— तर मग निजावें कसें, व जागें व्हावें कसें, हेंहि आह्मास कोणीच शिकविलें नाहीं; डोळे झाकायास आणि उघडायास आह्मी साहजिक बुद्धिनें शिकलों असूं.

आ०— यांत काय संशय, साहजिक बुद्धिनेच अणखी पाहा, तुझा लहान भाऊ उभा राहून थकला ह्मणून तो कसा जपून हळूहळू जमीनीवर बसतो आहे.

रा०— लहान बाळास पाहण्याकरितां मागें फिरून ह्मणतो, आहा! पहिल्याने तो एक हात खालीं ठेवितो आणि दुसऱ्या हातानें घट्ट धरितो. हो, हो, लहान बाळा, आतां तूं निर्भय आहेस बरें!

आ०— आणि पाहा मुला, पडण्याच्या धास्तीमुळें किंवा जोराने आपटूं नये ह्मणून तो आपले हात कसे जपून पसरतो, त्यावरून कोणाला असें वाटेल कीं त्यास शिलपाचे नियम जसे ठाऊक आहेत.

रा०— तथापि मुलें कारण न समजतां दुसऱ्याचें पाहून वारंवार तसें करीत नाहींत?

आ०— होय करितात; आणि याचसाठीं म्या तुला साहजिक बुद्धिचे जे दाखले दिल्हे त्यावरून पाहा कीं प्रत्येक बाळकास विचार करण्याची शक्ति नसती, ह्मणून त्याजवळ दुसरें एकादें बाळक पाहावयास नसलें तर ते काईन नामक पृथ्वीवरील पहिल्या लेंकराप्रमाणें एकटें पडून बोला चालायास कांहींच शिकणार नाहीं.

रा०— मला वाटतें हव्वा जी प्रथम स्त्री होऊन गेली तिला आपल्या लेंकराचा संभाळ करायास ईश्वराने स्वतः शिकविलें नसलें तर ती साहजिक बुद्धिने शिकली असेल.

आ०— माझ्या लाडक्या, ईश्वराने तिला शिकविलें यांत कांहीं संशय नाहीं; परंतु समक्ष येऊन नाहीं, तर ज्या रितीनें तो आपल्या लक्षावधी प्राण्यांस या निभ्रांत साहजिक बुद्धीच्या योगाने शिकवितो त्या रितीनें.

रा०— आहा! तूं मला सांगितलें होतें त्याची आतां मला आठवण झाली; पक्ष्यांस घरोटे बांधायास, आणि हिमनिद्रिस्त प्राण्यांस लागेल तेवढें आपलें अन्न सांठवून ठेवायास, त्यांच्या साहजिकबुद्धिनें त्यास प्रेरणा होती.

आ०— आणि तसीच प्रत्येक जनावराला पाहिजे तसें घर

करण्याची, भक्ष शोधण्याची, आणि आपल्या पिल्यांकरितां सामुग्री करून ठेवण्याची, फारच काळजी वाहावी लागती.

रा०— बरें, प्रत्येक जातीचे प्राणी नेहमी एकाच तऱ्हेचीं कामें करितात?

आ०— होय; आणि हा एक ज्ञान व साहजिकबुद्धि यांत भेद आहे. मनुष्य जो आहे तो कधीं नीच होतो किंवा उंच स्थिती प्रत पावतो, परंतु इतर सर्व जनावरांची वर्त्तणूक प्राचीन इतिहासांत सांगितली आहे त्याप्रमाणेंच हल्लीं पाहण्यांत येती. पाहा पशूंचे भक्ष शोधणें, पक्ष्यांचें आकाशांत उडणें आणि मत्स्याचें पाण्यांत पोहणें हें पृथ्वीच्या आरंभापासून तों आज दिवसपर्यंत जसेंचें तसेंच आहे.



पारवा.

रा०— प्राचीन काळांत ते कसे काय होते याविषयींचा वृत्तांत सांपडेल तर फार चांगलें होईल.

आ०— प्रिय मुला, धर्म पुस्तकांत प्रसंगोपात्त त्या काळच्या जनावरांचें वर्णन केलें आहे त्यावरून पाहतां आजतागायत त्यांच्या स्थितींत तिळ मात्र फेरफार झाला नाहीं. जलप्रलय झाला तेव्हां नोहा नामक पुरुष ईश्वरकृपेने तारवांत बसून वांचला होता, त्याने

तारवांतून एक पारवा पाण्यांत सोडला तेव्हां त्यास जसें पाण्यांत जाणें आवडलें नाहीं तसें हल्लींच्याहि पारव्यांस पाण्यांत जाणें आवडत नाहीं; आणि कावळे, ससे, मुंग्या, जंगली घोडे, शहामृग, चिमण्या आणि दुसरे पुष्कळ प्राणी, धर्म पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें, प्राचीन काळांत ज्या रितीने राहत होते त्याच रितीने हल्लीं राहतात.

रा०— खरें आई, धर्म पुस्तकांत जनावरांचें वर्णन वाचीत होतों त्या वेळेस त्यांचें प्राचीन काळचें व हल्लींचें आचरण किती बरोबर मिळतें हा विचार माझ्या मनांत अगदींच आला नाहीं. खचित, जनावरें दोन तीन हजार वर्षांमागें काय करीत होतीं तें मी त्या पुस्तकांत वाचलें.

इतकें हें माहित झाल्यावरून राबट याचें मुख आनंदीत दिसलें, व तेणेकरूत त्याची आईहि फार खुष झाली आणि कांहीं बोलणार इतक्यांत तो ह्मणाला.

रा०— आई, एक गोष्ट मला बरोबर समजत नाहीं; कांहीं जनावरांचें सारें आयुष्य पिंजऱ्यामध्यें जातें तेव्हां त्यांच्या स्वाभाविक स्थिती कशा काय राहत असतील.

आ०— बरें पुसलें मुला; तर पाहा तसी स्थिती प्राप्त झाली असतां तिची सवय लावून घेणें हा त्यांच्या मध्यें एक विशेष गुण आहे.

रा०— ह्मणजे काय?

आ०— पाहा, प्रत्येक जातीच्या पक्ष्यांस आपले घरोटे बांधायास निरनिराळ्या प्रकारच्या वस्तु लागत असतात, असें असतां जर त्यांस तशा वस्तु न सांपडल्या तर ते दुसऱ्यांवर कामचालवितात; जसें विलायतेंत राबीन नामें पक्षी आहे त्यास आपल्या घरोट्याचें अस्तर करायास ओक झाडाचीं पानें पाहिजेत, तीं न मिळालीं तर शेवाळ किंवा केस घेऊन तो आपलें काम चालवितो.

रा०— बरें कोणत्याहि पाळलेल्या जनावराचीं पिल्लीं सुटीं न सोडतां बंदींत ठेविलीं तर तीं आपल्या आईबापांप्रमाणें वागूं लागतील किंवा आपल्या जातीस्वभावावर जातील?

आ०— बहुतकरून सर्व जनावरांचीं पिलीं त्यांच्या त्यांच्या जातीप्रमाणेंच होतील, परंतु एकदां त्यांच्या आईबापांच्या मूळ स्थितींत फेरफार होऊन पुढें तो तसाच राहिला तर विहीं तसी-च होतील; जसें घरगुती मांजराचीं पिलीं बाळगून ठेविलीं तर तीं आपल्या आईबापांप्रमाणें गरीब आणि नम्र होतील, परंतु जंगलां-त नेऊन सोडलीं तर, त्यांच्या असल जातीप्रमाणें क्रूर होतील.

रा०— आई, जनावरें कधीं आपल्या भक्ष्यांत फेरबदल करितात?

आ०— त्याविषयीं ते फार चतुर आहेत, जो भक्ष त्यांस हितावह असेल तोच ते खातील, दुसऱ्यास शिवणार देखील नाहींत; वास्तविक म्या असें वाचलें आहे कीं त्यांस कांहीं विकृती झाली ह्मणजे ते साहजिक बुद्धीच्या योगें ज्या वनस्पतीनें आपला रोग बरा होईल असी शोधून आणितात; पूर्वीचे समुद्रपर्यटण करणारे लोक परदेशांत जात तेव्हां त्यांस तेथचीं फळें खावयाची झाल्यास पक्ष्यानी त्यांवर चोची मारल्या असतील तींच खात.

रा०— तर ज्या फळांत विष असेल तीं फळें पक्षी खात नाहींत ना?

आ०— ज्या भक्षानें विकृती होईल असा भक्ष फारकरून जनावरांस आवडणार नाहीं. एकदां मी एका गृहस्थास भेटायास गेलें होतें, तेथें त्याच्या वाड्यांत एक चोरटा उंदीर होता, त्यास जोड्यांचें चांबडे फारच अवडत असे ह्मणून जेथें जोडे ठेवीत असत तेथें कोणाचे नकळत जाऊन तो जोड्यांचे चांबडे कुरतुडून घेई. त्यास धरायाकरितां नाना तऱ्हेचें अन्न विषानें भरून मां-डिलें परंतु तेंहि नाहींसें होऊन उलटा त्या उंदरानें जोडे खाण्या-चा सपाटा चालविला, असें होतां होतां शेवटीं गुपचीप टपत बसून त्यास धरलें आणि त्याच्या बिळाचा शोध करून पाहतात तों त्यानें चोरून नेलेला सर्व माल अजुबाजूनें सफाईदार रचून ठेविला होता. निरनिराळ्या जातीचे बियांचे निरनिराळे ढीग केले होते, जोड्यांची कुरतुडून नेलेलीं चांबडीं, विषानें भरलेलें अन्न

याशिवाय दुसऱ्या चोरीस गेलेल्या जिनसा एकावर एक जशा रचतां येतील तशा रचून ठेविल्या होत्या.

रा०— आहा! काय चमत्कार! पण आई, त्याने इतकी सामुग्री खाऊन कां टाकली नाहीं?

आ०— प्रिय मुला, प्रति दिवशीं त्यास हवें तितकें मिळत असे ह्मणून त्यास साहजिक बुद्धीनें असें वाटलें असेल कीं पुढें आपणास मिळेल न मिळेल यासाठीं आधींच संचय करून ठेवावा हें बरें.

रा०— आई मग त्यास मारून टाकला—त्याच्या शाहाणपणावरून त्यास जिवदान द्यावें योग्य होतें.

आ०— जे कोणी हें पाहत होते त्या सर्वांसहि असेंच वाटलें, मुला, आणि ज्याची नुकसानी झाली होती त्याना देखील त्याची दया आली; परंतु तो उंदीर आसपास पाहून आपल्याला बंदींतून सुटून जाण्याची आशा नाहीं असें जेव्हां समजला तेव्हां त्यानें आक्रोश करून आपलें सर्वांग ताणलें आणि त्याच ठिकाणीं प्राण सोडिला.

रा०— आहा! आई, तूं त्यास पाहिलें?

आ०— नाहीं; परंतु ज्यानें त्यास प्रत्यक्ष पाहिलें त्याच्या तोंडून मीं ही गोष्ट ऐकिली. त्यानें ज्या ठिकाणीं प्राण सोडला त्या ठिकाणीं मी गेलें होतें.

रा०— आई; जनावरांस अकस्मात संकट येऊन पडलें तर तीं कसें करीत असतील?

आ०— जनावरांच्या वर्णनांचीं एक एक पुस्तकें पाहसील तर त्यांत याविषयींचीं समर्पक उत्तरें वाचून तुझें मन रमून जाईल. भ्रमरकीटकास आपला एकादा मेलेला मित्र घरोट्यांतून बाहेर काढतांना भारी वाटला तर तो त्याचे तुकडे तुकडे करून नेईल. अशा कामांत मुंग्या त्यांच्या युक्ती व दीर्घ प्रयत्न याविषयीं त्या फार प्रसिद्ध आहेत.

रा०— हा तरी चमत्कार होय; परंतु तुला आठवण आहे आई, आपली लुच्ची, कोंबडी बदकांच्या आंड्यांवर स्वस्थपणीं ब-

सून उबवीत होती, मग त्यांतून पिलीं निघाल्यावर तीं सर्व एक दिवस धावत जाऊन तळ्यांत पोहूं लागलीं तेव्हां ती कशी भयाभीत होऊन घाबरून गेली?

आ०— मुला, तिला जी भिती उत्पन्न झाली ती केवळ साहजिक बुद्धीकरून, कां कीं बतीं व आपलीं पिलीं यांमध्यें काय अंतर हें समजायाचें ज्ञान तिला नव्हतें, यास्तव जसीं आपलीं पिलीं पाण्यांत गेलीं असतां बुडून जाण्याची धास्ती तिला वाटावी तसीच त्या बत्यांविषयीं वाटून त्यांस हाका मारूं लागली.

रा०— बरें, आंड्यासारिखींच दुसऱ्या कशाचीं आंडीं करून घरोट्यांत ठेविलीं तर त्यांवर ती कोंबडी तितक्या काळजीनें बसेल कीं नाहीं?

आ०— होय होय, बसेल; एक कोंबडी खडुचीं केलेलीं आंडी उबवीत बसली होती; खऱ्या आंड्यांप्रमाणेंच तीं उलटीं सुलटीं जपून फिरवीत असे; परंतु तितका काळ लोटल्यावर त्यांतून पिलीं बाहेर येत नाहींसीं पाहिलीं, तेव्हां आपणास जें कर्तव्य तें तर आपण केलें असें समजून तिनें त्यांस सोडून दिल्हें; इतकें झाल्यानंतर ती निष्काळजी होऊन आपल्या घरोट्यांत निजायास गेली.

रा०— कां आई, मी असें समजत होतों कीं कोंबडीं बतीं हीं नेहमीं रात्रीस निजत असतात.

आ०— होय, पण कोंबड्यांस आंडीं उबवायाचीं असलीं अथवा लहान पिल्ल्यांस चारायाचें असलें तर त्या आपली रात्रीस निजायाची सवयी मोडून टाकितात, आणि लहान पिलीं मोठीं वाढून आईबापाबरोबर निजूं लागत तोंपर्यंत त्या पिल्ल्यांजवळ जागतच राहतात.

रा०— ओहो, त्या केवढी काळजी वाहतात! बरें आई, कांहीं जनावरें आजार किंवा मृत्यु याविषयींचीं भविष्यें सांगतात ही गोष्ट खरी आहे?

आ०— मुला, हवेंत फेरफार झाला तर तो कित्येक जनावरांस लागलाच समजतो; आकाश कितीहि तेजस्वी आणि स्वच्छ असूं द्या, जर वादळ व्हावयाचें असलें तर पक्षी व मेंढे हे कोठें

तरी आश्रयास जाऊन राहण्याची त्वरा करतील. सरदी गरमीचीं किंवा ऊन पावसाचीं चिन्हें कासवास जसीं समजतात तसीं दुसरे कोणासहि समजत नाहींत.

रा०— वास्तविक पण आई कासवावर तंबुसारिखी मोठी कवची आहे तर माझ्या मतें त्याने पावसाविषयीं अगदीं निर्धास्त असावें.

आ०— ऐक मुला! एक प्राचीन ग्रंथकार असें ह्मणतो कीं कासवास त्याच्या कवचीचें इतकें चांगलें आच्छादन आहे तरी पावसाच्या सरीनें आपण खराब होऊं याविषयीं तो जितकी काळजी बाळगतो तितकी कोणतीहि सकुमार बायको आपला पोषाक पावसांत खराब होईल याविषयीं बाळगीत नसेल.

रा०— असो, पण यावरून आजार किंवा मृत्युचें भविष्य सांगतील असें कांहीं नाहीं.

आ०— एवढी गोष्ट संभवण्याजोगी आहे कीं हवेंत फेरफार होऊन मनुष्यास कांहीं व्यथा झाली तर त्याप्रमाणें जनावरांसहि होईल, मग अर्थात त्यांस कांहीं अपकार होऊं लागला ह्मणजे ते अस्वस्थ होतील, तर नुसते एवढ्यावरून ते भविष्य सांगतात असें लोकानी उगीच कल्पिलें आहे.

रा०— जनावरांस पुष्कळ समजतें याविषयीं मागें जें सांगितलें त्यापेक्षां ज्वालामुखी पर्वताजवळ किंवा ज्या देशांत धरणीकंप होतात त्यांत राहणारीं जनावरें, डोंगर फुटायाचा किंवा तसाच कांहीं अपाय घडून यावयाचा असल्यास लोकांस त्याची सुचना करितात हें तर त्याहूनहि आश्चर्यकारक आहे.

आ०— तसेंच विलायत देशांत आल्प्स नामक पर्वतावर गाढवें साहाजक बुद्धीनें चढून जात असतात; मनुष्य तेथें पायानें चढला तर ठिकाणी ठिकाणीं खडपावरून कोसळून त्याचे तुकडे तुकडे होतील.

रा०— कां, आई, गाढवें तर पृथ्वींत सर्वांपेक्षां मूर्ख प्राणी दिसतात.

आ०— पण मुला, त्याचें पाऊल जमीनीवरून सरत नाहीं

ह्मणून सर्व डोंगरी देशांत इतर पशूपेक्षां विशेषेंकरून लोक त्यावरच बसतात. जे कोणी त्यांवर बसून एक दोन वेळा डोंगर चढले आहेत ते तर लगाम न धरितां निर्भयपणें बसून ते जसे जातील तसे जाऊं देतात.

रा०— खरेंच, काय?

आ०— घोड्यांस आणि कुत्र्यांस डोंगर चढणें आवडत नाहीं हें आपल्या पाहण्यांत आलें आहे, तर विलायतेंत डोंगरावरील घरें तुफानानें हालूं लागतात अशा प्रसंगीं त्यांतून मनुष्यें ओढून बाहेर काढायास किंवा पर्वत चढतांना थकून गेले असले तर त्यांस ते कुत्रे फार उपयोगी पडतात.

रा०— आई, विलायतेंत बरनर्ड नामें एक परोपकारिक माणूस होता तो पर्वतावर राहत असे, त्या जवळचे कुत्रे बर्फांत सांपडलेल्या मनुष्यांस बाहेर काढीत त्याप्रमाणेंच हे कुत्रे चांगले हुशार असतील.

आ०— पुष्कळ जनावरें संकटांत न पडावें ह्मणून साहजिक बुद्धीनें सावध राहतात. हिंदुस्थानांतून एक हत्ती विलायतेस पाठविला त्याचा चमत्कारिक वृत्तांत तुला ठाऊक नाहीं? त्यास तारवावर चढायास व उतरायास जे तक्ते मांडले होते त्यांवरून तो लागलाच चालून गेला नाहीं, त्यानें पाय ठेवून वारंवार तपासून पाहिलें आणि जेव्हां त्याची खातरी झाली कीं आपल्या भारानें ते मोडणार नाहींत तेव्हां तो त्यावरून चालून गेला. लवकर चालून जावें ह्मणून त्यास फार लालूच दाखविली व शेवटीं मारून पाहिलें तथापि त्यानें ते कांहींच मानलें नाहीं.

रा०— होय होय; पहिल्यानें आपला अगडबंब पाय त्या तक्त्यावर ठेवून तो घडी घडी हालवून पाहिला, शेवटीं मोडणार नाहीं असी त्याची खातरी झाली तेव्हां तो त्यावरून मोठ्या डौलानें चालून गेला.

आ०— कांहीं कीटक आपल्यास पिल्लीं होणार त्यापूर्वीच त्यांसाठीं भक्ष्य तयार करून ठेवितात. किती आश्चर्यकारक साहजिक बुद्धि ही! इक्नुमन जो तिचा भ्रमरकीटक आहे तो एक

अंडें घालतो आणि त्यावर लहान लहान बारा सुरवंट आणून ठे-वीत असतो.

**रा०**— बाराच कशावरून आई, त्याला मोजतां येतें?

**आ०**— नाहीं पण अंड्यांतून लहान कीटक बाहेर निघाल्या-वर ते सुरवंट खाऊं लागतो, मग बारावा सुरवंट खाल्यावर त्याची स्थिति बदलून तो कोशवासी होतो तेव्हां त्यास कांहींच खावयास लागत नाहीं.

**रा०**— आहा! केवढा चमत्कार हा!

**आ०**— दुसरे कित्येक प्राणी आहेत त्यांस आपल्या शक्ती पलीकडचीं कामें करायाचीं असलीं तर ते आपल्या जवळच्या एखाद्या प्राण्यापासून करवून घेण्यांत असेच कुशल असतात.



कोल्हा.

**रा०**— आई, मला तें बरोबर समजत नाहीं.

**आ०**— पाहा, कोल्हा कधीं कधीं सिंहास भक्ष्य मिळविण्या-विषयीं सहाय करितो तेव्हां त्यांतून त्यास थोडासा वटा सांप-डतो. याच कारणासाठीं एक लहान मासा आहे तो मुशी बरोबर फिरत असतो; पिना शिंप्याच्या कवचींत एक तीक्ष्ण दृष्टी-

चें माकुल राहतें, तें आपल्या राहण्याबद्दल पिन्याचा शत्रु त्यास मारायास येतो तेव्हां सूचना करितें, मग त्या सरसीच तो पिना आपली कवची आपणावर ओढून धरितो.

रा०— हें तर मला वाजवी व न्याययुक्त दिसतें.

आ०— मध भक्षक नावाचा पक्षी आहे तो आपणास मध मिळावी या आशेनें मनुष्यास व पुष्कळ जनावरांस मधमाशा कोठें असतात त्या दाखवून देतो. आफ्रिका खंडांत एक देश आहे तेथें हाटेंटाट नामें लोक राहतात त्यांस मध काढायाची झाली ह्मणजे या पक्ष्यास बरोबर घेऊन जातात, मग तो त्यांस मधिचीं पोळीं शोधून देतो तेव्हां ते त्यांतील मध काढून घेतात आणि त्या पक्ष्यास त्याच्या मेहनतीबद्दल थोडीसी मध देतात. अणखी असें सांगतात कीं हा पक्षी आपणाबरोबर पाथरवट नावाचा पक्षी घेऊन जातो, तो झाडाची साल फोडून त्यांतून मधमाशा शोधून काढितो आणि हा त्यांच्या पोळ्यांतील मध चोरून नेतो.

रा०— हा मोठाच चमत्कार! बरें आई, जनावरें मरून जातात तेव्हां त्यांच्या प्रेताचें काय होतें, तीं आपल्या दृष्टीस कोठें फारसीं पडत नाहींत.

आ०— जनावरांस स्वभाविक मृत्यु येण्याच्या पूर्वीं ते एकाद्या गुप्त ठिकाणीं राहतात, आणि हा एक त्यांच्या साहजिक बुद्धीचा दाखला समजावा; परंतु म्या कांहीं मधमाशांची असी गोष्ट वाचली आहे कीं, एका मेलेल्या चामडेलाला उचलून न्यावयास त्या शक्तिमान नव्हत्या ह्मणून त्यांहीं त्यास मेणाचा गिलावा केला, तेणेकरून त्याची कांहीं एक दुर्गंधी सुटली नाहीं.

रा०— बये, साहजिक बुद्धीनें जेवढें आपणास समजायाचें तेवढें सर्व समजतें तर आपण किती चमत्कारिक वस्तुचा शोध लावतों.

आ०— वास्तविक राबट कीर रानांत आणि खोल माहसागरांत कधींच समजणार नाहीं असे असंख्यात कावे दावे चालले आहेत ते सर्व आपणास समजते! थोडेसें जें कांहीं आपणास ठाऊक आहे त्यावरून आपण ईश्वराची किती स्तुती व प्रीति क-

रावी, त्याने आपणास जी बुद्धि दिल्ही आहे ती काय करील, याची आपणास कल्पनाहि करितां येणार नाहीं.

**रा०**— आई, मला वाटतें जनावरें आणि कीटक यांस मनुष्यापेक्षां पुष्कळ चांगल्या वस्तु करवतील.

**आ०**— खरें मुला, पण त्यांस ईश्वराने जो मार्ग लावून दिल्हा आहे त्यांत त्यांचें कळाकौशल्य जेवढेचें तेवढेच अधिक वाढणार नाहीं; परंतु मनुष्य जो आहे त्यास वाढवायाजोगी बुद्धि दिल्ही आहे, ती त्याने वाढविली असतां किती धूर्त जनावरें असोत त्यांपेक्षां तो श्रेष्ठच होईल.

**रा०**— आहा! पण जनावरांस मन दिल्हें नाहीं ह्मणून त्यास ईश्वराविषयीं कांहीं एक शिकवितां येत नाहीं.

**आ०**— अणखीहि मुला, ईश्वरास शरण जाऊन त्याच्या आज्ञेप्रमाणें चाललें असतां जें अक्षय सुख प्राप्त होणार तेंहि यांस नाहीं.



# प्रकरण ८.

---

मनांतील धन अथवा स्मृतिची शक्ति.

राबट यांचा चुलता विल्यम हा देशांतरास गेला होता, तो फार वर्षांनी घरीं परत आला; त्याने आपली स्त्री बरोबर आणली, ती फार गुणी असे. तिचा जन्म आर्बस्थानांत झाला तथापि ती इंग्लिश जातीची होती. स्वभावाने ती भला, आनंदवृत्तीची आणि कुशल असे त्यामुळें तिनें आपल्या लहान लहान पुतण्यांस व ध्वाड्यांस आपणाकडे लवकरच आर्जवून घेतलें.

एक दिवस ती राबट व दुसरे मित्र यांस बरोबर घेऊन आफ्रिका खंडांतून कांहीं जनावरें आणलीं होतीं तीं पाहावयास गेली. तेथें एका उंच इमारतींत कांहीं सुंदर जिराफ नावाचीं जनावरें नुकतीच आणून ठेविलीं होतीं त्यांजवळ तीं जात आहेत तों विल्यम साहेबाची मडम चमकली आणि "आहा माझी जन्म भाषा" असें ह्मणून ते स्वर ऐकायास मोठ्या त्वरेने पुढें गेली. एका गृहस्थास आरबी भाषा येत होती त्याबरोबर ह्या जिराफ जनावरांचे रक्षक बेडावीन जातिचे आरब कांहीं गोष्टी बोलूं लागले, तें राबटाने पाहिल्यावर त्यास मोठें आश्चर्य वाटलें. आहा! माझ्या मित्रास इतका आनंद वाटण्याजोगें ते काय बरें बोलत असतील, असें मनांत ह्मणून तें कौतुक पाहावयास तो मुकाट्यानें उभा राहिला.

तीं जनावरें पाहून आल्यावर विल्यम साहेबाचे मडमीने आपल्या पुतण्यास सांगितलें कीं माझी आया बेडावीन जातिची आरब होती, आणि पहिल्या ममतेचे शब्द जे माझ्या कानीं पडले ते त्या लोकांच्या भाषेंतले होते. अणखी ती ह्मणाली, "मी चार वर्षां-

ची झाल्यावर ती भाषा बोलतांना कधींच ऐकली नाहीं, त्यावरून मला वाटे कीं मी ती विसरून गेली असेन, परंतु नाहीं, प्रत्येक शब्द पाहिजे तेव्हां आठवेल, आणि ज्यांनी मला बाळपणांत पाहिलें ते कधीं मजसीं बोलायास येतील तर मी त्यांसंगातीं त्या भाषेंत मोठ्या आवडीने बोलेन."

ह्या लहानशा गोष्टीचा राबटाने विचार करून संध्याकाळीं ती



जिराफ.

आईस सांगितली आणि तिला पुसलें, "आई, स्मृति ही साहजिक बुद्धिसारिखी आहे काय? पाहा, कीं एकादी भाषा बाळपणांत शिकलों पण पुढें मोठेपणांत येऊन तिची वहिवाट ठेविली नाहीं तर तिची विस्मृति होणार नाहीं काय?"

आई— मुला, स्मृति ही साहजिक बुद्धीहून फार भिन्न आ-

हे. स्मृति ही मनुष्याच्या मनाची एक शक्ति आहे, आणि ती पाहिजे तेवढी वाढवितां व सुधारितां येती.

**राबट**— तर आई, जनावरांस कोणत्याहि गोष्टीची आठवण राहत नसेल?

**आ०**— कित्येक धूर्त जनावरें आहेत त्यांस एका प्रकारची बुद्धि किंवा उत्कृष्ट साहजिक ज्ञान आहे असें दिसतें. पाहा, कुत्रा आणि हत्ती यांजवर ज्यांहीं ममता केली असेल ते पुष्कळ वर्षांनी आले तरी त्यांस ओळखतील. तसेंच त्यांस छडलें असलें तर तें ध्यानांत ठेवून कधीं तरी त्यांचा सूड उगवितील.

**रा०**— आई, माझे धडे शिकायास मला फार कठिण कां पडतें? माझी स्मृति त्यांच्या सारिखी तर नसेल?

**आ०**— कदाचित कांहीं शब्द ध्यानांत ठेवायास तुला कठिण पडत असेल; परंतु जेव्हां त्याचा अर्थ समजूं लागेल, तेव्हां, मला वाटतें, मोठमोठाल्या गोष्टी व त्यांचें हसील त्यांची तुला चांगली आठवण राहत जाईल असें मला वाटतें.

**रा०**— असें आहे काय? पण आई, अमक्याची स्मृति कमी, अमक्याची जास्त, असें लोकांस ह्मणतांना म्या वारंवार ऐकिलें आहे, त्यावरून मला वाटतें कीं तें सर्व दैवयोगानें होत असेल.

**आ०**— मुला, मनाला धारणा शक्ती वगैरे जे गुण आहेत ते केवळ दैवयोगानेच होतात असें नाहीं. ईश्वरानें निरनिराळ्या लोकांस निरनिराळी बुद्धि व विचार दिल्हे आहेत, तथापि, त्यांस वेड लागलें असेल ते खेरीज करून सर्व लोक जसजसे प्रयत्न करतील तसतसे त्यांचे गुण वाईट किंवा चांगले होत जातील.

**रा०**— आहा! आई, ईश्वरानें दिल्हेली वस्तु बिघडून टाकावी हें मला अगदीं आवडत नाहीं, मला बुद्धि कितीहि थोडी दिल्ही तरी माझ्यानें जितकें होईल तितकें करून मी ती वाढवीन. चुलती, इतक्या भाषा कशी शिकली याचें मला आश्चर्य वाटतें; इंग्रजी, फ्रेंच, आरबी, मराठी आणि हिंदुस्थानी ह्या पांच भाषा तिला स्पष्ट बोलतां येतात, तुला ठाऊक आहे ना?

**आ०**— होय, आणि तिची आई, सात वर्षांची होती तेव्हां तिला सात भाषा बोलतां येत होत्या.

**रा०**— तर बये, प्रतीवर्षी ती एक एक नवी शिकली असेल?

**आ०**— तुझी चुलती असें ह्मणत होती कीं मोठमोठ्या शहरांत परकी लोक पृथ्वीच्या सर्व भागांतून जाऊन राहिले असतात ह्मणून तेथें मुलास असे गुण असले, तर यांत कांहीं नवल नाहीं. अशा शहरांत परकी लोक जोंपर्यंत राहतात तोंपर्यंत त्यांच्या घरीं हमेशा नवे नवे प्रवाशी पाहुणे येत असतात तेव्हां यावरून पाहा कीं त्यांच्या मुलांस आपल्या आईबापांबरोबर बोलायास एक भाषा शिकावी लागती आणि चाकरांबरोबर बोलायाला दुसरी, कां कीं ते आपल्या जन्मभाषेंत बोलत असतात. आणि त्यांच्या मित्राबरोबर बोलण्याकरितां कदाचित दुसऱ्या तीन किंवा चार शिकाव्या लागतात.

**रा०**— आई, या इतक्या भाषा ज्याप्रमाणें, त्यांस बोलतां येतात त्याप्रमाणें त्या सर्व वाचतां येतात?

**आ०**— तितक्या लहान वयांत येणार नाहींत. या भाषा वाचायास व शुद्धतेने लिहावयास शिकायाच्या असल्या तर निरनिराळीं सर्व मुळाक्षरें व व्याकरणाचे नियम शिकले पाहिजेत, आणि या कामास ह्मटलें तर कसेंहि फार दिवस लागतील.

**रा०**— आई, मला वाटतें, एक भाषा शिकून दुसरीस आरंभ केला तर पहिलीवर पाणी पडेल.

**आ०**— राबट, स्मृतींत जर तितका चमत्कारिक गुण नसता तर तसें झालें असतें. परंतु ईश्वराने आपल्या मनाची असी कांहीं रचना केली आहे कीं आपण परोपरीच्या विद्या शिकलों तरी त्या ध्यानांत राहतील, मात्र नीट शिकल्या पाहिजेत ह्मणजे त्यांविषयीं पुढें कांहींएक मेहनत न पडतां व्हाव्या त्यावेळेस उपयोगी पडतील. थोडकींच वर्षें झालीं असतील पार्लमेंट सभेच्या एका सभासदाने सभेच्या कित्येक चांगल्या कामासाठीं मेहनत करून तीं पार पाडलीं ह्मणून तो फार प्रख्यात झाला. असो, त्याने आप-

त्या पुत्रास असें लिहिलें कीं, काल रात्रीं म्या भाषण केलें त्यांत जो भाग लोकांस फार आवडला तो सुमारें तीस वर्षांमागें मी तरुण होतों तेव्हां एका पुस्तकांतून निवडून काढून पाठ केला होता, यास्तव तो आतां मला आठवला.

**रा०**— आहा! ही केवढी स्मृती!

**आ०**— खरें, अशा ह्या जुन्या गोष्टी पुनः आठवतात हें मोठें नवल आहे. पाहा, नुसता एकाद्या वाक्यावरून किंवा हलक्याशा गोष्टीवरून फार वर्षांमागें आपण कांहीं शिकलों असूं, त्याची आपणास आठवण होऊन फार कामीं पडतें.

**रा०**— वा! जिराफ जनावरांचे रक्षक बेडावीन आरब यांस पाहून चुलतीला जसी आपल्या दाईच्या भाषेची व तिच्या बोलण्याच्या ढबिची आठवण झाली त्याप्रमाणेंच हें आहे.

**आ०**— खरेंच मुला, त्याचप्रमाणें, आणि तूं स्वतःच पाहा कीं लाटिन व फ्रेंच भाषेचे जे धडे शिकलास ते वेळेवर आठवावे ह्मणून वारंवार पाठ करावे लागत होते असें कांहीं नाहीं, किंवा हिशोब लवकर करायास पाडे नित्यशः अवलोकन करावे लागत नव्हते.

**रा०**— खरेंच, कां कीं मी एकदां जें शिकलों तेंच वारंवार घोकीत बसलों तर नवे शिकायास अगदीं वेळ सांपडणार नाहीं.

**आ०**— मुला, स्मृति हें मनाचें एक कोठार आहे, यांत जसजशा अमूल्य वस्तु व्यवस्थेनें रचलेल्या असतील त्या त्याप्रमाणें त्या मनाचें सौंदर्य आणि कार्यहि घडेल.

**रा०**— हें कसें आई!

**आ०**— तुझी लहान तांबडी पेटी भरपूर भरलेली असली तथापि तिची किंमत फारच थोडकी होईल.

**रा०**— ठीकच अटरपटर पाहिजे तेवढें तींत भरून ठेवलें तरी तें कोणी एकाचेंहि उपयोगी पडणार नाहीं, यास्तव तें सर्व काढून टाकून त्यांत कांहीं चांगलें भरून ठेवावें हें बरें.

**आ०**— होय, उपयोगी व किमतीच्या वस्तु भरून ठेवा

परंतु त्या सर्व अस्ताव्यस्थ ठेवल्या तर तुला जें कांहीं पाहिजे तें वेळेवर हटकून सांपडणार नाहीं.

रा०— तर तें अटरपटर भरल्यासारिखेंच झालें कां कीं मला पाहिजे त्या वेळीं त्या वस्तु न मिळाल्या तर त्या अमूल्य असून उपयोगी पडल्या नाहीं तर मग फळ काय?

आ०— माझ्या मुला, स्मृतीची असीच व्यवस्था आहे. दुष्ट किंवा हलक्या गोष्टीने ती भरावी त्यापेक्षां रिकामी ठेवावी हें बरें; तशाच ज्ञानाच्या गोष्टी भरणें झाल्यास त्या तरी व्यवस्थेने भराव्या, नाहीं तर मोठेपणीं त्यापासून फारसा फायदाहि होणार नाहीं.

रा०— आई, मी खांचित सांगतों कीं माझी स्मृति रिकामी ठेवणें मला अगदीं आवडत नाहीं, ह्मणून माझ्याने जितकें शिकवेल तितकें शिकतच जाईन.

आ०— पण सांभाळ हो! तिच्यावर फार भार घालून ती दबून जाईल असें करूं नको, नाहीं तर तुझी पैक्याची पेटी भरगच्च भरली होतीस ती लंवडून पडली आणि आंतील जिनसा गमावल्या तसें होईल.

रा०— पण आई, मी निरनिराळ्या प्रकारच्या वस्तु नीट रचून ठेविल्या तर माझ्या पेटींत पुष्कळ मावतील.

आ०— वास्तविक; मनाचें कोठारहि असेंच आहे. निरनिराळे विषय चांगले रचित गेलों तर त्यांत व्हावें तितकें ज्ञान मावेल.

रा०— आई, लोक आपले मनाचें कोठार व्यवस्थेने कसें ठेवीत असतील बरें? मला हें मोठें गूढ दिसतें.

आ०— मुला, ह्याच कारणासाठीं तुजकरवीं परोपरीचें ज्ञान संपादन करवावें ह्मणून आह्मी निरनिराळ्या वेळा नेमून ठेविल्या आहेत; आणि तसेंच एका विषयाचे धडे शिकून चांगले समजलास आणि गरज पडली असतां ते तुला आठवतील असें झालें ह्मणजे तुला दुसरा विषय शिकायास सांगतों.

रा०— ठीक, मोठमोठे गंभीर विषय आहेत ते मी शाळेंत शिकतों, आणि करमणुकीच्या गोष्टी बाहेर फिरायास जातों अथवा

बाबाबरोबर कांहीं रमणीय स्थान पाहावयास जातों तेव्हां शिकतों; तर हें बरें आहे.

**आ०**— अणखी राबट, स्मृति ही आपल्या दुसऱ्या मनोवीकाराप्रमाणें कांहीं वेळानंतर त्रास पावती याजकरितां तिला एकच विषयावर लावून ठेवणें योग्य नाहीं ह्मणून निरनिराळीं कामें असलीं पाहिजेत.

**रा०**— आई, तूं काय ह्मटलेंस तें माझ्या लक्षांत आलें, कां कीं मी शाळेंत शिकत होतों तेव्हां समजलों न समजलों तरी पुस्तकांतीलच शब्द बोलायास सांगत त्याचा मला फार कंटाळा येई; परंतु ज्या वेळेस स्वतःचे शब्द बोलायाची परवानगी मिळाली तेव्हांपासून माझे धडे मला फार सोपे वाटूं लागले.

**आ०**— तुझ्या धड्यांचा अर्थ किंवा गोष्ट एकदां तुझ्या ध्यानांत उतरली ह्मणजे त्यांतील शब्द सहज ध्यानांत राहत; असो, पण आतां तूं बराच समजूतदार झालास ह्मणून मनाचा बंदोबस्त ठेवायास आतां मेहनत पडणार नाहीं.

**रा०**— आई, पण स्मृति वाढती?

**आ०**— होय मन आणि शरीर हीं जसीं वाढत जातात त्याप्रमाणें तिचीहि शक्ति वाढती आणि जर चांगली शिक्षा मिळाली तर कोठपर्यंत वाढेल हें सांगतां येत नाहीं.

**रा०**— आई, गेल्या पावसाळ्यांत पहिल्याने मी अशक्त पडून मग मला ज्वर आला आणि पुढें हरएक गोष्टीची विस्मृति पडत गेली, तर त्याचें कारण काय असेल?

**आ०**— शरीर रोगानें अशक्त झालें ह्मणजे तें मनाचे स्वाधिन राहत नाहीं असें होतें, आणि कधीं मनासीं अगदींच संबंध ठेवीत नाहीं, असें झालें असतां मनुष्यास कांहीं काळपर्यंत देहभान राहत नाहीं. केव्हां केव्हां शरीर सदृढ राहून नुसती मनालाच विकृती होती.

**रा०**— किती चमत्कार हा!

**आ०**— प्रिय मुला, शरीरांत वास करणाऱ्या आत्म्यासाठीं

ही कुडी केवढी नाजुक आणि आश्चर्यकारक केली आहे त्याचा हा एक दुसरा दाखला समज.

**रा०**— आजी ह्मणत असती, मला विस्मृति पडती, तर याचें कारण ती अशक्त होत चालली हेंच असेल असें, मला वाटतें.

**आ०**— वृद्ध मनुष्यांची शक्ति क्षीण होत चालली ह्मणजे ते वारंवार असेंच ह्मणत असतात; तथापि मागील गोष्टीची आठवण केली तर ते लहानपणांत शिकलेले इतकें बरोबर सांगतात कीं तें ऐकून मोठें नवल वाटतें.

**रा०**— मला वाटतें शिकून इतका काळ लोटल्यावर मनुष्यास विस्मृति पडेल.

**आ०**— असें कशावरून. बाळपणांत स्मृति जसी ग्राहक असती व एकादी गोष्ट त्या वेळेस जसी ठसून राहती तसी मोठें वाढल्यावर राहत नाहीं.

**रा०**— आजी आपल्या बाळपणांतल्या गोष्टी, पुस्तकें वाचलीं तीं, व जनावरें पाहिलीं त्यांचें वर्णन करूं लागती तेव्हां काय मौज वाटती! आहा! ती बरी असून गोष्टी सांगत बसती त्या वेळेस मला फारच आनंद होतो.

**आ०**— सहज एकाद्या लहानशा गोष्टीवरून तिला जुने लोकांची व दुसऱ्या मोठमोठ्या गोष्टींची आठवण कसी होती ती तूं कधीं पाहिलीस? आहा! कोणी ह्मणेल कीं जसी काय ती किल्यांचा झुमका घेऊन मनाच्या कोठारांत जाती आणि निरनिराळ्या आकृतीच्या किल्यानें प्रथम एक खण, मग दुसरा, नंतर तिसरा याप्रमाणें उघडूं लागती.

**रा०**— (कांहीं वेळ थांबून ह्मणतो) मला विचार करूं दे. हंहं! आज सकाळीं मी आजीला कांहीं फुलें नेऊन दिल्हीं तेव्हां ती ह्मणाली कीं साठ वर्षामागें मी लहान मुल होतें त्यावेळीं माझ्या आईनें मला एका प्रश्नाचें उत्तर केलें त्याची आठवण पाहा आतां मला तुझ्या एका प्रश्नावरून झाली.

**आ०**— प्रिय मुला, यावरून विचार कर कीं उतार वयांत त्यांच्या स्मृतीला इतका विसर पडतो, आणि बाळपणांत शिकतात

त्यांस स्पष्ट आठवण राहती तर बाळपणांतच चांगलें ज्ञान संपादन करून घेणें किती अगत्याचें आहे.

**रा०**— होय, मला वाटतें आपले धडे घट करायास ग्या अधिक मेहनत करावी ह्मणजे ह्मातारा झाल्यावर, सहज लहानशा गोष्टीवरून स्मरण झालें असतां कांहीं चांगल्या चांगल्या व खऱ्या गोष्टीहि आठवतील.

**आ०**— कोणत्याहि गोष्टीची आठवण अमुकच कारणानें पडती असें सांगतां येत नाहीं, कदाचित एकाद्या सुरावरून, गाण्यावरून, वेळेवरून, स्थानावरून किंवा दुसऱ्या कशावरूनहि होईल.

**रा०**— बये, स्मृतींत तरी किती गोष्टी भरून ठेवतां येतात; बरें गायन सहज ध्यानांत राहतें तसें वाजिवणें राहत असेल? कां कीं हें कृत्य जें आहे तें हरएक वाद्यावर हातानें होत असतें आणि तुतारी किंवा पोंवा तोंडानें वाजवावा लागतो.

**आ०**— मुला, गायन आणि चित्र काढण्याची विद्या यांचा अभ्यास करून फार दिवस झाले असले तथापि त्या पुनः चालू करितां येतील? परंतु ज्या कोणांस यांत फार प्रविण व्हावयाचें असेल त्यास नूतन अभ्यास फार अगत्याचा आहे.

**रा०**— आई, आपली स्मृति तीव्र केव्हां असती?

**आ०**— मुला, तूं आतां आहेस तेवढ्या वयांत; परंतु बाळपणांत याहून तीव्र असती.

**रा०**— आहा! आई! आपलें तान्हें बाळ जें आतां नुकतेंच बोलू लागलें आहे त्याचीहि स्मृति असीच तीव्र असेलना?

**आ०**— यांत काय संशय; नाहीं तर त्याच्या आसमंतात ज्या वस्तु आहेत त्यांचीं नावें, गुण इत्यादि तो कसा शिकेल.

**रा०**— असेंच कां आई, मांजर आली ह्मणजे "माव माव बोलणें" आणि भूक लागली असतां "मांम मांम" करणें हें तर स्वभाविक आहे असें दिसतें.

**आ०**— नाहीं मुला, तसें असतें तर चिनई अथवा हबशी लोकांचीं मुलें त्याच पदार्थांस त्याच शब्दानी बोललीं असतीं.

रा०— याविषयीं म्या कधीं विचार केला नाहीं.

आ०— वास्तविक पाहतां वस्तु व त्यांचीं नावें यांत कांहीं-एक संबंध नाहीं. पदार्थ दाखवायाचे असले तर आपण कांहीं शब्दांची योजना करून त्यांस नावें देतो; परंतु हीं सर्व आपल्या इच्छेप्रमाणें आहेत. निरनिराळ्या देशांत वस्तूचीं नावें इतकीं भिन्न असतात कीं तीं शिकायास फार मेहनत करावी लागती.

रा०— आई, लहान मुलें मोठीं वाढून वाचूं लागत आणि पुस्तकांतील धडे नेमाने घेत त्यापूर्वीं तीं खरोखर पुष्कळ शिकतात.

आ०— निःसंशय; प्रथम बोलायास शिकतांना किती सायास व मेहनत लागती हें समजायाचें असल्यास, आपण कधीं ऐकलीं नसतील अशा पुरुषांचीं, जागेचीं, वनस्पतीचीं अथवा जनावरांचीं नावें पाठ करावीं ह्मणजे किती कठीण पडतें तें समजेल.

रा०— वास्तविक, बाबा मला मुंबई शहरास घेऊन गेला तेव्हां, मी पहिल्याने किती गोंधळून गेलों! तेथें म्या ज्या चमत्कारिक वस्तु पाहिल्या त्यांतून कित्येकांचीं नावें फारच सोपीं होतीं तरीं तीं माझ्या ध्यानांत फारसीं राहिलीं नाहींत.

आ०— तसेंच पुनः वाचायास शिकतांना वर्ण आणि शब्द दाखविणारीं नव्या नव्या तऱ्हेचीं चिन्हें ध्यानांत धरावीं लागतात

रा०— लिहावयाचीं अक्षरें, आकडे, आणि छापील अक्षरें! आहा! जर आपणास स्मृती नसती तर आपण काय केलें असतें?

आ०— तसें असतें तर आपण पशुतुल्य झालों असतों; कां कीं त्यांस आपली बुद्धि अगदींच वाढवितां येत नाहीं.

रा०— बये, माझ्या मनांत एक निराळाच विचार आला आहे, मला वाटतें आपण जशा निरनिराळ्या भाषा शिकतों तसीं लेंकरेंहि शिकतात. परंतु पाहा तीं मोठीं झाल्यावर प्रत्येक भाषा शिकायाची त्यांस पुनः मेहनत करावी लागती.

आ०— तसेंच राबट; पण पुष्कळ भाषांचा एकमेकांसीं असा संबंध आहे कीं जों जों आपण शिकत जाव्या तों तों त्या सोप्या दिसूं लागतात.

रा०— आई, त्या दिवसीं संध्याकाळीं त्या लहान मुलाने

जोतिष प्रकरणावर भाषण केलें त्या मुलाची स्मृति केवढी चांगली असेल. त्यानें पुस्तकांत पाहिल्याशिवाय सूर्य, चंद्र, तारे, किती दूर आहेत तें अचुक सांगितलें.

**आ०**— वास्तविक; त्यानें जें भाषण केलें तें नुसत्या स्मृतीच्याच योगानें, कां कीं जेव्हां तो आह्मास भेटला तेव्हां तुझ्या वडिलांनी त्याजबरोबर कांहीं संभाषण चालविलें त्यावरून त्याला जोतिष प्रकरण अगदींच माहित नाहीं असें पाहून आह्मास आश्चर्य वाटलें; त्याला जें प्रश्न केले त्यांतून कित्येकांच्या उत्तरांचें त्यानें भाषण केलें होतें. त्यांतल्याच शब्दांनी दिल्हीं आणि कबूल झाला कीं ती विद्या मी शिकलों नाहीं.

**रा०**— मला वाटतें, तशा तऱ्हेचें ज्ञान त्याला कांहीं उपयोगी पडणार नाहीं.

**आ०**— नाहींच; मैना अथवा पोपट यांस जें शिकवाल तें बरोबर बोलून दाखवितील, परंतु तें तितकेंच; डुकराच्या पोराला शिकविलें तर तें थोडेसे शब्द समजतें आणि ते शब्द करायास जेवढे वर्ण लागतील तेवढे टिपून वर घेतें; परंतु त्याचें तें वरपंगीं ज्ञान लवकरच नाहींसें होतें कां कीं अधिक वाढवीन ह्मटलें तर त्याच्याजवळ कांहींच साधन नाहीं.

**रा०**— असें असलें तर पक्ष्यासारिखें अथवा डुकराच्या पोरासारिखें शिकल्यानें माझा परिणाम लागणार नाहीं.

**आ०**— मुला, तुझ्या स्मृतींत जें भांडार भरलें असेल तें सर्व ताडून व तोलून पाहत गेलें पाहिजे त्यांत जितकें निरुपयोगी असेल तें टाकून द्यावें आणि पुढें तुला व दुसऱ्या कोणाला जें उपयोगी पडेल तें रक्षून ठेवावें.

**रा०**— आई, स्मृति सदा सारिखीच राहील काय?

**आ०**— मला वाटतें राहील, कां कीं पुष्कळ मनुष्यांनी मरत्या वेळीं असें ह्मटलें आहे कीं आयुष्य कितीहि मोठें असलें तथापि आपल्या आयुष्यांत आपण जें जें केलें असेल अथवा बोललों असेल तें सर्व मृत्युसमयीं समोर दिसतें; आणि प्रत्येक मनुष्यानें या पृथ्वीवर काय काय केलें त्याचा हिशोब मी घेईन

असें ईश्वर ह्मणतो त्यावरून त्यांस वाटतें कीं तो हिशोब आतां आह्मास द्यावा लागेल.

रा०— आहा! आई, ज्यांचीं पापें ईश्वर आपल्या स्मरणांत न ठेवितां क्षमा करील ते किती सुखी होतील, परंतु दुष्ट लोकांस आपल्या पापाची आठवण राहून तें धुऊन जाणार नाहीं असें वाटेल तेव्हां ते किती दुःखी होतील.

आ०— वास्तविक दुःखी होतील! जो किडा मरत नाहीं किंवा जो अग्नि विझत नाहीं त्यांसारिखी त्यांची स्मृति त्यांस भासूं लागेल. सारांश दुष्ट लोकांवर ईश्वराने कृपा न केली तर त्यांस याच पृथ्वींत शासन होऊं लागतें; अपराधाचें स्मरण होऊन हृदयास टोंचणी होती तेव्हां दिवसास व रात्रीस स्वस्थपणा राहत नाहीं, मग असें होतां होतां शेवटीं तो हतभाग्य प्राणी दुःखाच्या वाऱ्याने वेड्यासारिखा होऊन मरण पावतो.



# प्रकरण ९.

---

शिंपींत राहणारा खेकडा अथवा जनावरांचीं निवारकें.

मडम साहेब आपलें काम करीत, खोलींत एकटी बसली आहे, इतक्यांत राबट हा दार उघडून आंत आला. तो आपल्या धाकट्या भावास बरोबर घेऊन समुद्रतिरीं फिरायास गेला होता, तेथें शिंप्या व कांहीं पाला टोपलींत भरून तीं एका हातांत आणलीं आणि दुसऱ्या हाताच्या मुठींत एक चमत्कारिक प्राणी घेतला होता; मग आपलीं बोटें हळुच उघडून तो प्राणी आईस दाखविला. ते समयीं त्या प्राण्याचे भयंकर आकडे व तो पिवळ्या रंगाच्या कवचींतून डोकावून पाहत आहे तें सर्व फारच आश्चर्यकारक दिसलें.

राबटानें आईस विचारिलें, "आई, हें काय आहे? या जातिच्या शिंप्यांत जे मासे राहतात, त्यांहून हा अगदी निराळा दिसतो. पाहा याला शेंवडीसारिखे आकडे आहेत."

मग आई ह्मणाली, "बाबा, ती एक खेंकड्याची लहानसी जात आहे. त्याला स्वतांची कवची नसती ह्मणून दुसऱ्या कोणाची रिकामी सांपडली ह्मणजे तो त्यांत जाऊन राहतो."

रा०— (त्या प्राण्याकडे पाहून ह्मणतो) आहा! त्याला बाहेर काढलें असतां कांहीं चिंता नाहीं. "अरे तूं बहुतेक बाहेर आलेला दिसतोस, तर अणखी थोडासा पुढें ये ह्मणजे मी तुला ओढून काढतों! असें ह्मणून राबटानें त्याचा एक आकडा धरून हळूच ओढला, परंतु त्याला आचका बसतांच तो तेवढा भाग त्याच्या हातांत आला, त्यावरून तो मोठ्यानें ह्मणतो, "आहा! आई, मला वाटतें या लहान प्राण्याला अपाय झाला."

**आ०**— चिंता नाहीं मुला, खेकडे व शेंवडें यांत हा एक विशेष गुण आहे कीं तीं जिवंत असतां त्यांचा एकादा आकडा मोडला तर त्याबद्दल नवा फुटतो, परंतु या प्राण्यास पाण्यांतून बाहेर निघून फार काळ झाला त्यामुळें तो अर्धमेला झाला आहे.

इतक्यांत तो शिंपींतला खेंकडा आपल्या कवचिंतून सुटा होऊन मेलेला बाहेर पडला तेव्हां मडम साहेबानें त्याच्या लांब शेपुटीस अंकडी होती ती दाखवून ह्मटलें पाहा राबट या अंकडीनें त्यानें आपलें घर धरून ठेविलें होतें.

**रा०**— पण आई, तो दुसऱ्याची शिंप कशास घेतो?

**आ०**— त्याला स्वतांचें निवारक नाहीं ह्मणून आपल्या एकाद्या शेजाऱ्याजवळून उसनें घ्यावें असें त्याची साहजिक बुद्धि त्यास शिकविती.

**रा०**— परंतु तो मोठा वाढत जातो तसें त्यास मोठें घर लागत नसेल?

**आ०**— होय, आणि जेव्हां तो नव्या घराचा शोध करूं लागतो तेव्हां तें पाहण्याची मोठी मौज आहे.

**रा०**— मला तें पाहावयास मिळेल तर फार चांगलें होईल. तो कसें काय करितो?

**आ०**— तो रांगत रांगत समुद्रतिरीं जातो, आणि भरतीबरोबर ज्या रिकाम्या शिंप्या येतात त्या उलटून पालटून पाहतो; पहिल्यानें एक घेऊन नीट तपासून पाहतो, ती जर बरोबर न आली तर दुसरी घेतो याप्रमाणें एकादी बरोबर सांपडे तोंपर्यंत असेंच करीत जातो.

**रा०**— बरें सर्वच लहान किंवा मोठ्या असल्या तर तो उघडाच फिरत जाईल?

**आ०**— छी! नाहीं; त्याला दुसरें घर सांपडेपर्यंत तो आपलें जुनें सोडीत नाहीं.

**रा०**— आई तो आपलें घर ओढीत कसें नेत असेल?

**आ०**— पाहिलीसना त्याच्या शेपुटीच्या शेवटास अंकडी

आहे तेणेकरून आणि ती अंकडी याच कारणासाठीं दिल्ही आहे असें दिसतें.

**रा०**— किती चमत्कारिक! सर्व खेकडे शिंप्यांत किंवा खडकांतील बिळांत राहत असतील?

**आ०**— मुला, या जातिचे दुसरे प्राणी आहेत त्यांस स्वतांचीच शिंप जडलेली असती, आणि ते प्राणी जसे मोठे वाढत



शिंपींत राहणारा खेकडा.

जातात तसी तीहि त्यांबरोबर मोठी वाढती मग ती जीर्ण झाली ह्मणजे तिच्या बद्दल नेमलेल्या काळीं नवी येती. त्यांस दातांसारिखे आकडे असतात ते त्यानी आपल्या शत्रूवर मारले तर त्यांस घायाळ करून टाकतील.

**रा०**— (आपली टोपली ओतून ह्मणतो) या सर्व शिंप्या जनावराच्या घरासाठींच केल्या असतील?

**आ०**— त्यांस घरें किंवा ढाली ह्मटल्या तरी चालेल, कां

कीं तेणेंकरून त्यांचें शत्रूपासून असें संरक्षण होतें तसा आम्हांहि चांगला होतो.

**रा०**— आई, गोगलगायाहि आपल्या शिंप्यांत राहतात, तर त्या शिंप्या त्यांचीं घरेंच आहेत.

**आ०**— वास्तविक; पण जेव्हां हिंवाळा येतो तेव्हां थंडीच्या कहरामुळें त्या जमिनींत हिमनिद्रा घेतात आणि फार करून दगडाखालीं किंवा पानाखालीं दडून राहतात नाहीं तर पक्षी त्यांच्या शिंप्यासुद्धां त्यांस खावयास चुकणार नाहींत.

**रा०**— तर त्या शिंप्यांस त्यांचीं कवचें ह्मणावीं. आहा! त्यांच्या आकृतीहि किती परोपरीच्या असतात!

**आ०**— शिंप्याचे तीन वर्ग केले आहेत. एकपुट, ह्मणजे शंख कवडी यांसारिख्या; द्विपुट, ह्मणजे कालव, मुक्तास्फोट किंवा शंबूक.

**रा०**— म्या लायड मडमीच्या झाडींत कांहीं शिंप्या पाहिल्या त्याची मला आठवण आहे; परंतु त्या फारच मोठ्या होत्या व त्यांत पुष्कळ पाणी सांचलें होतें.

**आ०**— अंः त्यातर लहान, याहूनाहि इतक्या मोठाल्या आहेत कीं त्यांत राहणारे प्राणीच चारशें किंवा पांचशें रत्तल भारी असतात.

**रा०**— ओहो! तर तें मोठें कवच होय! परंतु आई शिंप्याची एक तिसरी जात आहे असें तूं ह्मणाली होतीस.

**आ०**— बहुपुट, ज्याच्या कवचांचीं ज्यांस दोहोंपेक्षां अधिक तुकडे असतात; ह्मणजे खडकांत खुबडीं असतात तशा. कांहीं शिंप्यांचें त्यांत राहणाऱ्या प्राण्यांस सर्व बाजुनी आछादन झालेलें असतें; डोकें व अवयव बाहेर काढायापुरतीं मात्र छिद्रें असतात. कासवाच्या कवचासहि अनेक तुकडे आहेत.

**रा०**— काय! तुझ्याजवळ कासवाचे कवचीच्या सुंदर पेट्या व फण्या आहेत त्या आपण कराचीस जाते वेळीं जे प्राणी पाण्यावर पोहतानां पाहिले तशांच्या कवचीच्या खऱ्याच केल्या असतील?

**आ०**— खऱ्याच मुला, त्यांच्या नांवावरूनच समजतें.

**रा०**— पण आई, कासव फारच अंधुक रंगाचा आहे, तुझ्या गंजाचें घर जसें शोभिवंत चित्रविचित्र रंगाचें दिसतें तसा तो अगदी दिसत नाहीं.

**आ०**— नसेल, कां कीं त्या कवचीच्या कांहीं वस्तु करायाच्या असल्या तर तिचे पातळ थर किसून काढतात, आणि शोभिवंत दिसून लोकांनी घ्याव्या ह्मणून त्यावर जिल्हई देतात; ती कवची जोंपर्यंत त्या जनावरावर आहे तोंपर्यंत जाड व अंधुक रंगाची असती, याजकरितां माझ्या फणीसारिखी ठिसूळ असण्यापेक्षां तूं सांगतोस तसी असली तर त्या जनावराचें रक्षण करायास फार उपयोगी पडेल.



कवडो व रंगीत शंख.

**रा०**— कांहीं कासव खातात त्यांची कवची असीच सुंदर असती ?

**आ०**— तेवढी सुंदर नसती आणि तिच्या जिनसाहि तितक्या सफाईदार होत नाहींत असें आहे तथापि जनावरास एवढी उपयोगी पडती.

**रा०**— आई, चमत्कारिक पदार्थांचा संग्रह पाहावयास गेलों

होतों तेथें कांहीं शिंप्या पाहिल्या त्यांतून कित्येक सुंदर रंगानें प्रकाशित व कांहीं अंधुक दिसत होत्या तर हें कसें!

**आ०**— कांहीं शिंप्या आहेत त्या मोठ्या वाढूं लागल्या ह्मणजे त्यांस आपोआप जिल्हई चढती; दुसऱ्या कित्येक आहेत त्यावर एक जाडा थर असतो तो काढून टाकल्याशिवाय त्यांचे सुंदर रंग उमटत नाहींत.

**रा०**— आई, शिंप्या कशाच्या होतात?

**आ०**— फारकरून चुन्याच्या होतात. आणि राहणाऱ्या प्राण्याबरोबर तिची आकृती व्हावी ह्मणून तो वाढवीत असतो.

**रा०**— खरें आई, नवी शिंप न देतां त्यांतल्या प्राण्यास ती जुनीच शिंप सर्वकाळ बरोबर पडेसी करणें हें मोठें गूढ दिसतें, आई, तें कसें होत असेल?

**आ०**— ऐक मुला, आंड्यांतून उबून पहिल्यानें बाहेर निघाले ह्मणजे सर्व शिंपींत राहणाऱ्या मास्यांस एक लहानसें घर पूर्वींच तयार करून ठेवलेलें असतें. त्याचें घर बांधायाकरितां जो पदार्थ लागतो तो उत्पन्न करण्याची ईश्वरानें त्यांस शक्ति दिल्ही आहे, ह्मणून तो प्राणी प्रती वर्षी वाढत जातो त्याप्रमाणें तो पदार्थ उत्पन्न होऊन त्याचें घरहि वाढत जातें. या रितीनें त्या प्राण्यास् जन्मल्यापासून मरेपर्यंत घर जसें पाहिजे तसें चांगलें बेताचें असतें.

**रा०**— आणि त्या शिंप्या जडून कशा राहतात?

**आ०**— तरतऱ्हेच्या स्नायूने; निरनिराळ्या प्राण्यांस निरनिराळे स्नायु असतात. गोगलगाईची कवच तिच्या शरिराचे मध्य भागास पट्यानें बांधलेली असती. दुसरे आरगोनाटसारिखे आहेत. ते रुंद उघड्या शिंपींत किंवा शिंपीच्या वरच्या भागास जडलेले असतात. दुसरे कित्येक प्राणी आहेत ते मोठे वाढत चालले ह्मणजे शिंपीच्या निरनिराळ्या भागास जडत जातात आणि तिचा जो भाग निकामी झाला असेल तो काढून टाकतात.

**रा०**— तें फारच आश्चर्यकारक होय; तो निकामी भाग ते कसे टाकून देत असतील?

आ०— कसें तें माहित नाहीं; परंतु त्या शिंप्यांचा आकार इतका बदलून जातो कीं पूर्वी त्यांत निराळेच प्राणी राहत असतील अशा त्या दिसूं लागतात.

रा०— हें मोठें नवल आहे.

आ०— खेंकडे व शेंवडी मोठीं झालीं ह्मणजे आपल्या शिंपा बदलून टाकतात आणि त्याबद्दल त्यांस नव्या येतात तथापि त्यांचा आकार अगदीं जुन्यासारिखाच असतो.

रा०— दुसऱ्या एकाद्या प्राण्याने आपली शिंप टाकून दिल्ही असेल त्यांत शिंपींत राहणाऱ्या खेकड्यासारिखे ते जाऊन राहताल?

आ०— नाहीं; जुन्या शिंप्या टाकून दिल्ह्यावर नव्या येत तोंपर्यंत तीं तसींच राहतात.



आरगोनाट.

रा०— पण आई, त्यांवर शिंप आली नाहीं तोंच त्यांस एकाद्या मोठ्या माशाने खाल्लें तर?

आ०— असें सांगतात कीं, तीं तसीं उघडीं झालीं ह्मणजे एकांत कोनपडांत दडून राहतात.

रा०— परंतु नवी शिंप वाढायास किती काळ लागतो?

आ०— मला वाटतें ती दोन तीन दिवसांत तयार होत असेल, आणि इतका काळपर्यंत तो प्राणी निचेतन पडून राहतो ह्मणून त्यास अन्न शोधण्याकरितां बाहेर पडावें लागत नाहीं.

रा०— तीं कितीदां बदलून टाकतात?

**आ०**— बहुतकरून वर्षांतून एक वेळ बदललें ह्मणजे त्यांस मोठें सुख होतें.

**रा०**— कासवहि आपल्या कवच्या बदलतात?

**आ०**— नाहीं त्यांस फार अवघड पडेल, कां कीं त्यांच्या कवच्यांचें सुटे सुटे थर असतात, आणि किनारीवर ते एकमेकांसीं जडलेले असतात. ईश्वरानें कांहीं तजविज करून ठेविली आहे त्यावरून त्या किनारीकडे शिंगाच्यासारिखा कांहीं पदार्थ नवा-नवा उत्पन्न होतो तेणेंकरून जनावर जसजसें वाढत जातें त्यात्या-प्रमाणें त्याचें कवच रुंद होतें.

**रा०**— आहा! मास्याच्या सुखाकरितां ही सर्व तजवीज किती ममतेने केली, आहे! कित्येक शिंपींत राहणारे मासे तर फारच विद्रूप असतात.

**आ०**— यावरून पाहा कीं ईश्वर आपल्या अति नीच प्राण्यासहि कोणत्या गोष्टीची अडचण पडूं न देतां सुख व्हावें ह्मणून किती तर्तूद ठेवतो, आपल्या दृष्टीनें मात्र तें साधारण दिसतें.

**रा०**— आई, आज सकाळीं मी समुद्रतिरीं असतां माझ्या जवळून एक गृहस्थ गेला त्याच्या हातांत वाटोळी गोळ्यासारिखी कवच होती ती कशाची असेल?



**आ०**— ती अथवा याची शिंप; कधीं कधीं तिजवर काटे असतात ते त्याचे लहानसान शत्रूस मोठे भयंकर दिसतात. स्टार नामक मासा आहे त्याच्या शिंपीवर कीर्णासारिख्या रेघा व काटे असतात.

**रा०**— आई, याप्रमाणें सर्व मास्यांस कांहीं तरीं निवारक असतें?

**आ०**— देवमासा व मुशी मासा हे आपल्या बळेंकरून आपलें संरक्षण करितात. ते खेरीज करून बाकीचे सर्व लहान मास्यांस कांहीं तरीं निवारक असतें.

**रा०**— काय त्या साऱ्यांस शिंप्या असतात?

**आ०**— नाहीं, कित्येकांस जाड कातडी असती, कित्येकांस जळमाणसासारिखी आखुड लव असती; परंतु मास्याचें साधारण चिलखत ह्मटलें तर त्यांचीं खवळें होत; तीं एकावर एक अशा तऱ्हेनें रचलीं असतात कीं तसेंच कांहीं साधारण अरिष्ट असलें तर त्या खवळानें त्यांचा बचाव होतो.

**रा०**— कित्येक मास्यांवर सुंदर रंग दिसतात ते या खवळाच्या योगानें असतातना?

**आ०**— त्यांच्या योगानें रंग तर नाहीं परंतु रंगाची छाया दिसती खरी; हीं खवळें निरनिराळीं तपासून पाहिल्यावर त्यांतलें प्रत्येक खऊळ, हस्तीदंताच्या लहान सुंदर तुकड्या सारिखें दिसतें. आणि निरनिराळे जातिचे मास्यांचीं खवळें भिन्नभिन्न आकृतिचीं असतात व तीं लहानशाहि मास्यास आच्छादन करायास हजारो हजार केलेलीं आहेत.

**रा०**— शिंप्याप्रमाणें तीं सर्व खवळें त्यांच्या अंगावर वाढतात?

**आ०**— होय; आणि हीं मासळींचीं खवळें थोडीसीं गोळा करून नीट रचूं लागलों तर ईश्वर आपल्या बुद्धि व कळा कौशल्यें करून तीं मास्याच्या अंगावर आपोआप कसीं वाढवितो तें पाहून त्याच्या बुद्धिकौशल्याचें अधिकाधीक आश्चर्यच वाटेल.

**रा०**— कां आई मास्याचें प्रावरण पक्ष्यांच्या पिसासारिखेंच चमत्कारिक दिसतें.

**आ०**— होय, तें तसेंच दिसतें; हलकें, पण तितकेंच पातळ, कठीण, आणि टिकाउ. म्या मासळीच्या खवळांचीं फुलें केलेलीं पाहिलीं आहेत, आणि त्यांविषयीं शोध करीपर्यंत तीं कोणत्या सुंदर पदार्थांचीं असीं नकसीदार केलीं असतील हें माझ्या लक्षांत आलें नाहीं.

**रा०**— खचित! आतां कधीं मी मासळी बाजारांत गेलों तर तेथून तरतऱ्हेच्या माश्याचीं खवळें घेऊन येईन.

**आ०**— बरें, तर घेऊन ये ह्मणजे आपण हेनरी काकाला सांगून त्याच्या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून तीं पाहूं. अणखी राबट तुझ्या आजाजवळ मेलेला साळू मासा आहे त्याप्रमाणें कित्येक मास्यांच्या पाठीवर काटे असतात.

**रा०**— होय त्याचे कांटे किती तिक्ष्ण होते ते मला ठाऊक आहेत; ते एकादे लहानसे मास्याला लागले तर ठार मारून टाकतील.

**आ०**— असें कां ह्मणतोस, अरे, ते माणसाला लागले तरी घायाळ करून टाकतील. कांहीं जंगली लोक हे काटे आपल्या बाणांच्या टोकांस लावीत असतात. पोंक मासा आहे त्याला हाडाचें लांब टोंक पुढें आलेलें असतें आणि त्याच्या दोहीं बाजूवर करवतीसारिखे दाते असतात ते त्याने नावेचे किंवा तारवाचे तळावर मारले तर लागलेच छीद्र पडतें.

**रा०**— आई, तर मग ते मोठे भयंकर प्राणी असतील?

**आ०**— बरें तूं यंत्रांतून विजेचा आंचका कधीं घेतला आहेस?

**रा०**— होय त्या वेळीं मोठा धक्का लागून आंगांतून सर्व शक्ति गेली असें वाटलें.

**आ०**— कांहीं मासे आहेत, ते आपल्या शत्रूंस असाच विजेचा धक्का मारितात.

**रा०**— आहा! आई इतका वेळपर्यंत तूं मला जें सांगितलेंस त्यापेक्षां हें तर फारच आश्चर्यकारक आहे. बरें ते कोणत्या जातीचे मासे असतील?

**आ०**— एका पाखट जातीच्या मास्यांत व एका जातीच्या घामांत हा चमत्कारिक गुण आहे.

**रा०**— आई त्यांचा आचका मनुष्यांस बसतो तर आपल्या-ऱ्याने त्यांस पकडवणार नाहीं.

**आ०**— त्याचा आचका मनुष्याच्या शरीरास फारच ला-

गतो ह्मणून कोंळ्यांस ते मासे धरायाचे असले तर ते पहिल्यानें त्यांस पुष्कळ दमवितात आणि मग धरूं लागतात. माकली आपलें संरक्षण दुसऱ्या एका चमत्कारिक रितीनें करितो.

. **रा०**— ती कोणती रीत, ती मला कृपा करून सांगसील?

**आ०**— तो आपल्या तोंडांतून काळ्या रंगाची गुळणी सोडतो, तेणेंकरून पाणी असें रंगून जातें कीं त्याखालून तो केव्हां निसटून जातो हें समजत नाहीं.

**रा०**— हें एक मौजेचें लपणें होय.

**आ०**— अणखी दुसरी गोष्ट म्या ऐकली आहे कीं, समुद्रफेन जिवंत धरला तर कुयलीसारिखे कांहीं लागून हातास फोड येतात.

**रा०**— पण आई जमीनीवरचीं जनावरें आपल्या शत्रूबरोबर कसीं लढत असतील?

**आ०**— माऊला तूं छडलेंस ह्मणजे ती काय करील?

**रा०**— निखालस आपल्या नखानी मला बोचकरील.

हीं तीक्ष्ण शस्त्रें कसीं आहेत तीं त्याला दाखवावीं ह्मणून मडम साहेबानें मावमाव करतांच ती गोंडस मांजर उडी मारून आपल्या धनीणीच्या मांडीवर गुरगूरत बसली आणि आपले पाय मुकाट्यानें तपासूं दिल्हे. "राबट इचीं नखें कोठें आहेत? तीं मला दिसत नाहींत; इची डावली कसी मखमली सारिखी मऊ आहे ती हात लावून पाहा!"

**रा०**— असो, पण आई खचित तिला नखें आहेत. होय ती पाहा आंतून दिसतात; जेव्हां त्यांची गरज लागत नाहीं तेव्हां ती त्या घट्ट मोज्यांत किती सफाईनें ठेवती.

**आ०**— सिंह, वाघ, आणि दुसरे पुष्कळ जनावरांस या तऱ्हेचें म्यान व त्यांत तीक्ष्ण शस्त्रें असतात, अणखी मुला, त्यांस असे विक्राळ दांत असतात कीं नुसते त्यानीच ते आपली शिकार मारतात.

**रा०**— मला वाटतें सुस्वभावाचा हत्ती आणि मोठ्या आ-

कृतीचा गेंडा यास त्यांच्या चेमट कातड्यांचे निवारक पुरे होत असेल नाहीं बरें ?

आ०— तितकेंच नाहीं मुला; त्यांस लांब दाढी असतात त्यावर ते बिथरले तर एकाद्या वाघास धरून चिरून टाकायास चुकणार नाहींत.

रा०— ओहो, त्यासारिखें भयंकर मला कांहींच वाटत नाहीं.

आ०— अणखी साळू टणक कांट्यासारिखे केसांविषयीं अथवा कुरराचे नखांविषयीं तर अजून कांहींच सांगितलें नाहीं.

रा०— म्या साळू हातपाय गुंडाळून कांट्याचे गोळ्या सारिखे बसलेलें पाहिलें आहे, परंतु कुरराचीं नखें कसीं असतात तीं पाहिलीं नाहीं.

आ०— त्यास कधीं पाहसील तर नीट ध्यानांत ठेव. आणि पुष्कळ पक्ष्यांस चोंची मजबूत असतात, त्या त्यांच्या संरक्षणाचींच आयुधें होत.

रा०— मोठा हंसहि आपल्या पाखाने कसा मारतो! आई त्या भ्रमराच्या डंशाने माझी आंगठी किती सुजून गेली होती, मी तर नेमच केला आहे कीं अतःपर भ्रमराला कधीं छडणार नाहीं.

आ०— तसेच कित्येक सापास विखारी सुळे दांत असतात, ते कोणत्याहि प्राण्यास मारले तर तो तात्काळ मरण पावेल.

रा०— आई, पिटर साहेब आह्मास सांगत होता कीं घाटावर त्याच्या देखत असल्या सापांच्या दंशाने पुष्कळ मनुष्यें मरण पावलीं.

आ०— विंचू, घोण, आणि दुसरे पुष्कळ कीटकहि मोठा प्रखर दंश करितात; पाहा नुसती मधमाशी किंवा चिलट चावलें तर आग आग करून देते, आणि मेंढे, घोडे यांस, हे व यांसारिखे दुसरे कीटक इतका त्रास देतात कीं तेणेकरून ते आजारी पडून मरून जातात.

रा०— टामस साहेब ह्मणत होता कीं वेस्टइंडीज देशांत

एक लहान जीव प्रवाशांस फार हैराण करितो, तो कोणता जीव असेल बरें?

आ०— हं, ती चिगो. ती एका जातिची बारीक पीस आहे. ती मोठ्या युक्तीनें माणसाच्या पायाच्या कातडींत जाऊन राहती, मग एकदां तिनें आपल्या आंड्याची लहान पिशवी तेथें ठेविली ह्मणजे पराकाष्ठेचा दाह होऊं लागतो, नंतर त्या आंड्यांतून शेकडोंसें पिसा निघून पायाला फापरें पाडतात, तेव्हां त्या नासलेल्या भागांतून त्या पिसा साफ काढून टाकल्या नाहीं तर त्यापासून ज्या कळा लागतात त्या पुसायास नको.

रा०— मग अगदींच चैन पडत नसेल.

आ०— तुझे फोडाच्या कशा कळा सुटल्या होत्या त्याची तुला आठवण असेलच.

रा०— होय, पुरे झाल्या त्या वेदना.

आ०— तो तुझा मोठा फोड आगमाशीच्या अंगांतील बारीक भुका लागून झाला होता.

रा०— बरें ती माशी जीवंत धरली तरी फोड येईल?

आ० होय, हा गुण ईश्वरानें त्यांच्या संरक्षणार्थ दिल्हा आहे यास्तव त्यांस मोठ्या सावधगिरीनें धरलें पाहिजे.

रा०— आई त्या माशा मोठ्या असतात काय? त्यांस धरतात कसें?

आ०— त्या माशा एवढाल्या असतात परंतु त्यांवर सुंदर हिरवा आणि सोनेरी रंग असतो. त्या युरपखंडाच्या निरनिराळ्या भागांत तजीचे झाडावर सांपडतात; कधींकधीं त्यांस इंग्लंड देशांतहि धरून ठेवतात. जे त्यांस धरायास जातात ते आपले तोंडावर जाळीचे पडदे घालतात आणि खांद्यापर्यंत हात घट्ट चांबड्याचा मोज्यांनी झांकून त्या निजलेल्या पाहून त्यांस टोपल्यांत झाडून घेतात. हें कृत्य त्यांस फार जपून करावें लागतें कां कीं त्यांच्या त्वचेस जरा स्पर्श झाला तर लागलाच फोड येऊन आग सुटती.

**रा०**— तर आई, संरक्षणाचे निरनिराळे आयुधांस अंत नाहीं असें दिसतें.

**आ०**— अणखी एक सांगतों, कित्येक प्राणी असे आहेत कीं त्यांची कोणी पाठलाग करूं लागला ह्मणजे ते पराकाष्ठेची दुर्गंधी सोडितात ती एथपर्यंत कीं त्या पाठलाग करणाऱ्या शत्रूच्या पोटांत कळमळ होऊं लागते आणि जिवास फार त्रास होऊन तो अर्धमेला होतो, इतक्यांत तो प्राणी त्याच्या हातांतून निसटून जातो.

**रा०**— आई मी तुझा फार उपकारी झालों. माझ्या लहान शिंपींत राहणाऱ्या खेकड्यावरून आपण किती मनोरंजक गोष्टी केल्या. ह्या सर्व ढाली आणि आयुधें मी कधीं विसरणार नाहीं.

**आ०**— तर मुला, ईश्वरावर भरवसा ठेवून पुण्याची ढाल करण्याच्या उद्योगांत ऐस ह्मणजे तुला मृत्युचें किमपि भय वाटणार नाहीं.



## प्रकरण १०.

---

चिनई मास्याचें प्रातर्भोजन अथवा सूक्ष्मदर्शक यंत्रांतील चमत्कार.

मासे ठेवायाच्या एका वर्तूळ बिलोरी पात्रांत गोडें पाणी भरतांच त्यांतील तेजस्वी प्राणी इकडून तिकडे पोहूं लागले, आणि त्या स्वच्छ पाण्यांत खेळूं लागले; घटकेंत खाली बुड्या मारीत घटकेंत सपाटीवर येत आणि चपळाई व उत्सुकता फार दाखवीत, ती राबट लक्ष लावून पाहत होता तथापि ते असी चळवळ कां करितात हें बरोबर समजला नाहीं.

एका उघडे खिडकीजवळ एक मेज होतें त्यावर त्याची आई हें भांडें ठेवीत आहे तेव्हां तो ह्मणाला, "आई ते मासे काय करितात? आपलीं तोंडें उघडून इकडून तिकडे पोहत जातात तर ते कांहीं धरीत आहेत कीं काय?

**आई**— होय मुला; मी नुकताच त्यांस ताजा खाऊ घातला आहे, त्यावर ते यथेच्छ प्रातर्भोजन करीत आहेत.

**राबट**—कशाचा खाऊ? पाण्याशिवाय तूं त्यांस दुसरें कांहींच दिल्हें नाहींस.

**आ०**— मुला, तुला ठाऊक नाहीं; मी तर त्यांस एक दोन दिवस पुरे इतका खाऊ दिल्हा आहे.

**रा०**— तो त्यांहीं लागलाच खाऊन टाकला असेल; कां कीं त्या मास्याच्या भांड्यांत पाण्याशिवाय मला दुसरें कांहींच दिसत नाहीं.

**आ०**— नाहीं, त्यांचें खाणें अजून पुरें झालें नाहीं; पाहा त्यांचीं लहान तोंडें कसीं चाललीं आहेत.

रा०— ते नुसते आकरून तोंडें वासतात, पाहा पाहिजे तर तेथें त्यांस खावयास कांहींच दिसत नाहीं.

आ०— वास्तविक ह्मणसील तर त्यांचा भक्ष तुझ्या दृष्टीस पडायास तुझे डोळे तितके तीक्ष्ण पाहिजेत.

रा०— पण आई, तूं वारंवार ह्मणतीस कीं माझे डोळे तुझ्या डोळ्यापेक्षां अधिक तीक्ष्ण आहेत. ते लहान मासे काय खातात तें तुला दिसतें ?

आ०— नाहीं मुला, कां कीं ते चिनई मासे दुसऱ्या पुष्कळ लहान प्राण्यासारिखे अदृश्य जीवजंतु खाऊन राहतात.

रा०— परंतु अदृश्य जीव ते कसे धरीत असतील ?

आ०— त्यांस गोगलगाईच्या शिंगासारिखी केसांची बारिक झालर असती तेणेंकरून ते पाणी सतत सारीत असतात.

रा०— तर पाण्यांतले बारिक जीव ते आपल्या तोंडांत सारून नेत असतील !

आ०— ती केसांची झालर हालवाहालव करून पाण्यांत ते लहानसा भोवरा उत्पन्न करितात ह्मणजे त्यांस ते बारिक जीव धरायास फार चांगलें फावतें.

रा०— तसी झालर सर्व लहान मास्यांस असती ?

आ०— असें मला वाटतें. शंबुक आणि कालव यांस फारच सुंदर असती आणि तेणेंकरून त्यांस भक्षहि पुष्कळ मिळतो. बारिक जीवांत कित्येक मोठमोठे जीव आहेत त्यांवर तसी झालर दृष्टीस पडती ह्मणून सृष्टीजन्य पदार्थांचा शोध करणारे असी कल्पना करितात कीं हीं सोईवार उपांगें अदृश्य प्राण्यांसाहि असतील.

रा०— आई, त्यांतून कित्येक बारिक जीव माझ्या मनांतून पाहावयाचे आहेत.

आ०— राबट, सूक्ष्मदर्शक यंत्र आहे त्याला कांचा अशा प्रकारच्या बसविल्या असतात कीं त्यांतून जे पदार्थ आपण पाहावे ते मोठे दिसतात.

रा०— तर मग हेनरी काकाजवळ सूक्ष्मदर्शक यंत्र आहे तें आपण मागून आणूं.

आ०— हेनरी काकाचें सूक्ष्मदर्शक यंत्र तितकें मोठें नाहीं कीं त्यांतून चिनई मासे या स्वच्छ पाण्यांतले बारीक जीव धरतात ते दिसतील. (पुस्तकें ठेवायाचें कपाट उघडून ह्मणती) हीं पाहा मोठया यंत्रांतून कित्येक बारीक जीव पाहिले, त्यांचीं चित्रें.

रा०— चित्रांकडे पाहून ह्मणतो, आहा आई, किती विचित्र आकृतीचे प्राणी! हीं खऱ्याच जिवंत प्राण्यांचीं चित्रें आहेत. कांहीं प्याल्यासारिखीं कांहीं चाकांसारिखीं.



साचलेल्या पाण्याच्या थेंबांतील बारीक जीव.

आ०— एका विद्यालयांत एक सौरसूक्ष्मदर्शक यंत्र आहे त्यांतून म्या तसे प्राणी पुष्कळ जिवंत पाहिले आहेत ते हिंस्रपशूसारिखे पारध करून एकमेकांस मारीत होते.

रा०— काय! ते एकमेकांस खातात?

आ०— होय. ह्या लहान प्राण्यांत निरनिराळे आकृतीचे जीव इतके लहान आहेत कीं ते आपल्याला अगदी दिसणार नाहींत; चिनाई मासा त्यांसीं ताडून पाहिला तर देवमास्याइतका मोठा होईल, मग तो त्या सर्व बारीक जिवांस सरसकट खात असेल यांत काय आश्चर्य.

रा०— बरें त्यांस मोठ्या जनावरासारिखें ज्ञान असेल?

आ०— त्यांस जितकें ज्ञान असायाचें तितकें आहे आणि त्यांच्या वर्तणुकीवरून पाहतां असें दिसतें कीं मेंढे किंवा गाई यांस जसें सुखदुःख समजतें तसें त्यांसहि समजतें.

**रा०**— आहा! आई असें कसें होईल ?

**आ०**— राबट, मी एका मोठया सौरसूक्ष्मदर्शक यंत्रांतून चरांतील पाण्याच्या थेंबांत जे प्राणी पाहिले ते अगदी वेगवेगळे दिसले; त्यांतून कित्येक लहान होते ते मोठयांच्या झपाटयांतून निसटून जाण्याचा यत्न करीत तशांत दोघे सारखे बळाचे मिळत तेव्हां त्यांची लहानसी लढाई झाल्याशिवाय एक दुसऱ्यास गुमानीत नसे.

**रा०**— शेवटीं दोहोंतून एक जिंकला जाई काय ?

**आ०**— ऐक; फार वेळ त्यांचें युद्ध झाल्यावर जो अधिक बळवान असे तो आपल्या शत्रूस घायाळ करून जय मिळवी त्यावेळेस तो चीत झालेला प्राणी घायामुळें कांहीं वेळानी मरण पावे हें सर्व आपण पाहिलें तर त्यावेळेस त्यांची दया येऊन मोठें दुःख वाटतें.

**रा०**— आई, मी खचित सांगतों कीं तसें मी पाहीन तर अति अल्प प्राण्यांसाहि कधीं दुखविणार नाहीं. असो, पण मोठया जनावरांप्रमाणें माशा व सुतेरे यांच्याहि अवयवांत हाडें खरींच असतात ?

**आ०**— होय; आणि तीं असीं सफाईनें जडलेलीं असतात कीं त्यांस आपलीं निरनिराळीं कामें करायास कांहीं एक अवघड पडत नाहीं.

**रा०**— आणि त्यांचे डोळे आपल्यासारिखेच आहेत ?

**आ०**— कांहीं कांचे आपल्या सारिखे आहेत; परंतु कित्येक बारीक प्राण्यांचीं दृष्टी इंद्रियें आपल्यापेक्षां अधिक नाजूक व गुरफाटलेलीं असतात तेणेंकरून आपणास जे पदार्थ अदृश्य आहेत ते त्यांस स्पष्ट दिसतात.

**रा०**— तर मला वाटतें चिनई मासा जे बारीक जीव खातो ते त्यास साफ दिसतील ?

**आ०**— होय. ह्या लहान प्राण्यांचा जसजसा बारीक शोध करीत जावा तसतसें त्यांचे मौजेकरितां सुखाकरितां आणि रक्षणाकरितां जें साधन करून ठेवलें आहे तें अधिकाधीक आश्चर्य-

कारक दिसूं लागतें. ह्या चित्रांकडे पाहा, काय तें पाख सुंदर दिसत नाहीं?

रा०— होय आई सुंदर दिसतें खरें. इतकें रुंद पसरायास त्यांत केवढीं लहान लहान हाडें असतील.

आ०— तें कानघोणीचें पाख आहे.

रा०— आई, कानघोणीला पाखें असतात हें मला ठाऊक नव्हतें.

आ०— नसेल, कां कीं तीं फार मोठीं नसतात, आणि जेव्हां त्यांचें काम लागत नाहीं तेव्हां तीं लहान झाकण्यांत वळून ठेवतात ह्मणून राबट सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणारांस त्यांचा शोध फार उशिराने लागला.

रा०— पाहा आई, ज्या चर्माने तीं झांकलेलीं आहेत तें किती पातळ व पारदर्शी दिसतें!

आ०— आणि हें पाख इतकें नाजूक कपरधुलासारिखें बारीक आहे तथापि त्यांत असंख्यात रसवाहक शिरा आहेत त्यांतून, तो प्राणी जिवंत आहे तोंपर्यंत, द्रवरूपतत्व जाऊन त्या पाखाचें जिव्हन घडतें. याप्रमाणें माशी, चिलटें, आणि दुसरे प्राणी यां-



च्या पाखांची रचना केली आहे. कित्येक प्राण्यांचे पाखांस बारीक केसांची शोभिवंत झालर असती तेणेंकरून त्यांस धुळीपासून किंवा पावसापासून इजा होत नाहीं.

रा०— आई, हे लहान प्राणी मोठमोठे ग्रह व तारा यांपेक्षां देखील मला चमत्कारिक दिसतात.

**आ०**— प्रिय मुला, ग्रह व तारा यांविषयीं आपणास थोडकेंच माहित आहे; परंतु ज्या ईश्वरानें आपल्या अद्भुत च्यातुर्यें करून आणि कोमळ ममतेनें इतकें मोठें आकाश केलें तोच ईश्वर या आणुरेणूसारख्या जिवांचा सांभाळ करितो हें आपणा क्षणभंगूर मानवांस समजल्यानें किती आनंद वाटतो.

**रा०**— फारच आनंद वाटतो आई. आतां जेव्हां मी एकाद्या बारीक जीवाकडे पाहीन तेव्हां ईश्वर मला विसरतो असी काळजी कधीं बाळगणार नाहीं.

**आ०**— परंतु राबट, कीटकांची नुसतीं पाखें चमत्कारिक आहत इतकेंच नाहीं तर त्यांच्या पाखांची ढाकणीहि चमत्कारिक आहेत, तीं सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिलीं ह्मणजे त्यांची मोठी करामत व शोभा दृष्टीस पडती.

**रा०** — मी तें आपल्या डोळ्यानें पाहिलें परंतु तें सर्व एक सारिखें दिसतें, बहुतकरून सिंगाप्रमाणें; रंग मात्र निरनिराळे दिसतात.

**आ०**— निरनिराळे रंग दिसतात तें मला वाटतें फारकरून त्या झांकण्यांला जीं खवलें असतात त्यांच्या भिन्नभिन्न आकृतीवरून व रचनेवरून असावें.

**रा०**— आई, मासळीला खवलें असतात हें तूं मला सांगितलेंस त्याची मला आठवण आहे, परंतु कीटकांसहि असतील असें मला वाटत नव्हतें; तीं फारच लहान असतील.

**आ०**— प्रिय मुला, आपल्याजवळ अति उपयोगी विद्यासंग्रहाचीं पुस्तकें आहेत, त्यांत तऱ्हेवार मासलींच्या खवळांच्या आकृती मोठाल्या काढून दाखविल्या आहेत आणि त्यांच्याच समोर त्यांच्या स्वभाविक आकृतीहि आहेत. त्या कशा परोपरिच्या आहेत त्या पाहा.

**रा०**— आहा! हीं एथें बाम मास्याचीं खवलें आहेत, तीं लेफ मास्याचीं; तीं फार सुंदर आहेत. एक एकाला वलक्या आहेत आणि वर आडव्या आडव्या रेघा आहेत, दुसरीं लांब, चौरस, आणि वाटोळ्या आकृतिचीं आहेत.

आ०— ह्या खवळांची रचना निरनिराळ्या प्रकारची आहे. कित्येक लहान आहेत तीं मासलीच्या खवळासारिखी एकावरएक रचलेलीं आहेत; जीं मोठमोठीं आहेत तीं आपण आंगांत चिलखत घालावें तद्वत कीटकाचे अंगास बसतीं आहेत.

रा०— आई, मासळीच्या खवळांवर जशा भिन्नभिन्न खुणा असतात तशा कीटकांच्या खवळांवरहि असतात?

आ०— वर जो भेद सांगितला त्यावरून असी कल्पना होती कीं त्या दोहोंत प्रकार मिळून सारिखेच आहेत; परंतु कीटकांचीं खवळें नरम आणि गुलगुलित असतात आणि जर त्यांचे पाखांस हात लावला तर तीं फुसकन धुळीप्रमाणें हातास लागतात.

रा०— मी एकादें फुलपाखरूं अथवा तसर धरली तर माझ्या हातास तांबडी किंवा पिवळी भुकी लागती; आई, ती भुकी खवळांची असेल काय?

आ०— होय मुला, तीं खवळें केवळ लहान पिसासारिखीं असतात, आणि तरतऱ्हेच्या कीटकांवर तरतऱ्हेच्या आकृतीचीं असतात आणि एकाच कीटकाचे निरनिराळे भागांवर पाहसील तरी भिन्नभिन्न दिसतात.

रा०— आई, माझें मोराचें पीस जितकें चमत्कारिक आहे तितकीं फुलपाखरांचीं चमत्कारिक असतील?

आ०— सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणारे असें सांगतात कीं कीटकांचे आच्छादनांत करामतीचा व सौंदर्याचा चित्रविचित्रपणा जितका विशेष आहे तितका पक्ष्यांचे आच्छादनांत नाहीं. याचा खरेखोटेपणा पाहावयाचा असल्यास एथे एक बिस पाखाचे तसरीचें चित्र काढलें आहे तें पाहा. तिच्या दोन आकृती काढल्या आहेत, लहान आहे ती तिची स्वभाविक आकृती आणि मोठी आहे ती सूक्ष्मदर्शकांत पाहिलेली.

रा०— आहा! केवढें विलक्षण!

आ०— पक्ष्यांचा पिसारा सूक्ष्मदर्शक यंत्रांतून जेवढा सुटा तपासतां येतो तेवढा फुलपाखरांचा येत नाहीं कारण तो फारच बारीक असतो; असें आहे तथापि मोराचे किंवा कुरराचे पिसाप्र-

कांहीं संशय नाहीं.

**रा०**— मला वाटतें मधमाशीचे केंस सूक्ष्मदर्शक यंत्रांत फार चमत्कारिक दिसतील, कां कीं ते यंत्राशिवाय देखील सुटे दिसतात.

**आ०**— वास्तविक; परंतु निरनिराळे प्राण्यांचे सुटेसुटे केंस सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिल्यावर त्यांच्या आकृतींत फारच भेद दिसून येतो.



**रा०**— असें आहे काय ? तर सर्व केस एकसारिखे नसतात ?

**आ०**— नुसते मनुष्याचेच केस किती आकृतीचे आहेत ते पाहा, कांहीं वाटोळे, कांहीं चौरस, कांहीं त्रिकोनी प्रत्येक केस लांब नळीप्रमाणें पोकळ असून एका शेवटास त्याचें मूळ असतें तेथें त्यास चामडींतून जीवन प्राप्त होतें आणि दुसऱ्या शेवटाकडे चिरून त्यास बारिक बारीक कुसू फुटतात.

**रा०**— खराच हा मोठा चमत्कार !

**आ०**— वागळाचे लवेला डाहळ्यांचे बुंदासारिख्या गाठी असतात; कांहीं कीटकाचे केस सारिखे सारिखे अंतरावर पाठीचे कांट्याप्रमाणें दिसतात.

**रा०**— वा ! केसांस इतक्या आकृती आहेत असा माझ्याने कधींच तर्क करवताना.

**आ०**— चिचुंद्रीला जे बारिक नरम लवेसारिखे केस असतात ते तिच्या स्थितीस फारच योग्य आहेत. त्यांतले कांहीं उभे व





कांहीं अंतरा अंतरावर आडवे असतात, तेणेकरून तिला कोणीं भिवविलें तर तिच्या बिळाच्या अरुंद रस्त्यांत, कांहीं अडथळा झाल्याशिवाय पाहिजे तसें तिला मागें पुढें धावतां येतें.

**रा०**— दुसऱ्या जनावरांचे लोकरीसारिखी तिची लोकर असती तर तिला तसें करायास कांहीं अडथळा होता?

**आ०**— होय; फारकरून तसी लोकर जाड असती त्यामुळें दगडाचे टोकाला लागून ती अडखळेल इतकेंच नाहीं तर तेणेकरून सुटी माती हळुहळु सरकून तिचा जाण्यायेण्याचा रस्ता बंद होईल.

**रा०**— तर मला वाटतें लोकर बहुतकरून पिसांसारिखी एकाच बाजुस राहत असेल.

**आ०**— होय बहुतेक जनावरांची तसीच राहती. पाहा मांजराचे अंगावर उलटेकडून हात फिरविला तर तिला आवडणार नाहीं; तसेच तुझे केस ज्या बाजूने वाढतात त्याच्या उलटेकडून दाबले तर तुला कळ येईल.

**रा०**— तसेच आई, मांजराचे तोंडावर जे लांब लांब केस दोहों बाजूंस असतात त्यांस हात लावला तर त्यास कां बरें आवडत नाहीं? ते केस कशासाठीं असतील?

**आ०**— सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणाऱ्यांस अजून त्याविषयीं संशय आहे; एका अर्थी ते त्वगेंद्रियाप्रमाणें उपयोगी पडतात असें दिसतें. जेव्हां त्या काळोखांत उंदराची पारध करितात तेव्हां हे केस दोहों बाजूंस त्यांचे शरीराचे रुंदीएवढे उभे राहतात तेणेकरून मांजराला आपला रस्ता अरुंद असला तर लागलाच समजतो.

**रा०**— आई, मला वाटतें कीं, ते केस साधारण केसापेक्षां ताठर असतील

**आ०**— ते बहुतकरून डुकराचे केसासारिखे असतात आणि इतके टणक कीं त्यांचे कुंचे केले तरी होतील. शरीर जाणणारे वैद्य असें सांगतात कीं ते केस हलके मासाळ पदार्थांत रुतलेले असतात आणि त्यांच्या बुंदाजवळ कोमळ नाडी

नाडीच्या योगानें ती लागलीच मेंदूला समजते म्हणून मांजराला जी एवढी धूर्तता आणि हुशारी आहे ती यामुळेंच असेल, असा तर्क होतो.

**रा०**— आई, कांहीं वनस्पतीला केस असतात, तेहि मोठे चमत्कारिक असतील.

**आ०**— खाजकोलतीचे केसांची असी कांहीं रचना आहे कीं, त्यांस धक्का लागला म्हणजे त्यांच्या बुंदाकडे एक लहानसी कोथळी असते ती दाबून त्यांतून अणूरेणूसारिखा विषाचा थेंब बाहेर येतो तो हातास लागला तर फार कंड सुटते.

**रा०**— पण आई, कधींकधीं मी कुयली हातांत जोराने धरली होती तरी तिची अगदी कंड सुटली नाहीं हें कसें?

**आ०**— त्याचें कारण हें कीं तूं तितकें बळकट धरलेंस, त्यामुळें त्या लहान विषाच्या कोथळ्या न उघडतां उलटया बंद झाल्या. तसेंच मुला, कीटकांच्या नांग्याहि सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिल्या असतां परोपरीच्या दिसतात.



मधमाशिची मागली तंगडी.

त्यांच्या नांग्या अशा असतात कीं दंश केल्यावर त्यांचा सल रुपून राहतो दुसरे कित्येक कीटक आहेत त्यांस त्रिशूळासारिख्या नांग्या असतात.





**रा०**— आहा! तर अशा नांग्यांस फार भिऊन चाललें पाहिजे. पाहा आई तेथें एक मधमाशी आपले पाय कसी घासित आहे.

**आ०**— तिने आपल्या मागल्या तंगड्यांचे सांध्यांतील पोकळ भागांत जे पदार्थ घालून घरीं आणले आहेत ते मळीत बसली आहे. मधमाशांचे व साधारण माशांचे पायांस जो लोकरीचा साज असतो व जेणेंकरून त्यांस कांचेवर व गुळगुळीत छतावर चालतां येतें तो फार चमत्कारिक आहे.

**रा०**— आई, अशा लहान कीटकांस दांत असतात? असले तर फार बारीक ह्मणून ते सूक्ष्मदर्शक यंत्रावांचून दिसणार नाहींत.

**आ०**— होय, पुष्कळ लहान प्राण्यांस बारीक बारीक सुंदर दांत असतात. गोगलगाया व जळवा यांचे दांत सुईचे अग्राइतके बारीक दिसतात.

**रा०**— मी दुखणाईत होतों तेव्हां जळवांचे दातांचा चटका कसा बसे त्याची मला आठवण आहे.

**आ०**— शेकडोंशे हे बारीक जीव ज्या शिंप्यांत राहतात त्यांची आकृती मोठ्या शिंप्याप्रमाणेंच चमत्कारिक असती.

**रा०**— आई, मला लहान शिंप्या फार आवडतात. समुद्रतिरीं मला कांहीं सांपडल्या त्या काळ्या कापडावर किंवा काळ्या कागदावर ठेविल्याशिवाय दिसणार नाहींत इतक्या बारीक होत्या तथापि जवळ धरून पाहिल्या तेव्हां त्या दुसऱ्या शिंप्याहून फार सुंदर दिसल्या.

**आ०**— आपल्या लेण्याच्या कित्येक सुंदर वस्तूसाठीं आपण अगदी अदृश्य अशा प्राण्यांच्या मेहनतीचे फार ऋणी आहोंत.

**रा०**— ह्मणजे काय?

**आ०**— पाहा तुझे बहिणीचें पोवळें कीडयाचें कृत्य आहे तें.

**रा०**— आहा आई, मला वाटत होतें कीं पोवळीं समुद्रांतील पाल्यासारिखीं समुद्राच्या तळीं वाढतात.

**आ०**— राबट, तीं वाढायास फार काळ लागतो; एका प्र-

तयार करितात मग ते मेल्यावर त्यांचे वंश त्यांच्या जागेवर नव्या इमारती बांधतात, याप्रमाणें वंशपरंपरेने बांधून बांधून पोवळ्यांचे मोठमोठे खडक होतात.

**रा०**— पोवळ्यांचे खडकांविषयीं म्या पुष्कळदां ऐकलें आहे, परंतु कीड करीत असतात असें मला ठाऊक नव्हतें.

**आ०**— हे खडक काळेंकरून मोठे वाढत जातात आणि त्यांवर वनस्पती फुटून त्यांचीं बेटें होतात. याप्रमाणें झालेलीं बेटें पासिफीक माहसागरांत पुष्कळ आहेत.



पोवळ्याचें झाड.

**रा०**— हें तर फारच आश्चर्यकारक आई.

**आ०**— तें तर काय परंतु बारीक बारीक जिवांनी गाळून टाकलेल्या, शिंप्याचे दगड होऊन त्या दगडांच्या इंग्लंड देशांत बहुतेक मोठमोठ्या इमारती बांधल्या आहेत हें ऐकसील तर तुला किती आश्चर्य वाटेल.

**रा०**— बये, ती गोष्ट खरी असेल काय?

**आ०**— होय खरी आहे. विलायतेंत आक्सफर्ड, केंब्रिज आणि दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं सर्वोत्कृष्ट देवालयें ज्या दगडानें बांधलीं आहेत तो दगड सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिला असतां बारीक शिंप्या व पोवळ्यांच्या अंशानी भरलेला दिसतो.

रा०— असे हे लहान प्राणी मोठमोठीं देवालयें व विद्यालयें बांधण्याचें सामान तयार करितात याचा विचार केला असतां किती आश्चर्य वाटतें !

आ०— एक पुरातन ह्मण असी आहे कीं 'सर्व खडू हा किड्यानी तयार केलेला आहे, आणि जरी या ह्मणीविषयीं संशय वाटत होता तरी ती आतां अक्षरशः खरी असी ठरली आहे.

रा०— बये, ती कसी?

आ०— कां कीं खडूमध्यें या बारीक जिवाच्या रिकाम्या शिंप्या असतात; जील्हई केलेल्या कागदाच्या चकत्या व झालर यांस नुसत्या सफेत्यानेच जिल्हई देतात असें नाहीं तर खडूचीहि देतात याजकरितां त्या चकत्या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिल्या तर त्यांवर लहान लहान शिंप्याचें चित्रविचित्र जडावाचें काम दिसतें.

रा०— आई, तुझ्या चकचकीत कागदाच्या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून कशा दिसतात त्या मला पाहावयाच्या आहेत.

आ०— कांचेचे प्याले धुरांड्यावरचें सुंदर काम आणि नाना तऱ्हेचे शोभिवंत कांचेचे ठाय यांची उत्पत्ती पाहूं गेलों असतां या उद्योगी बारीक जीवांचे मेहनतीपासून आहे असें स्पष्ट दिसून येईल.

रा०— बये, ती कसी, ती कृपा करून सांगसील तर फार मौज आहे.

आ०— ऐक मुला, ज्या गारीची कांच करितात ती सर्व एकदां बारीक जीवांचें आच्छादन होती असें दिसतें. गोमेद आणि अकीक यांचीहि असीच उत्पत्ती आहे; आणि प्रशिया देशांतील बीलनी नामक गावांत शिकील करण्याच्या दगडामध्यें बारीक जिवांच्या गारिचीं कवचें इतकीं असतात कीं त्या दगडाच्या एक तसूभर जागेंत त्यांच्या चार आब्ज निरनिराळीं कवचें सांपडतात.

रा०— आई, तर हे लहान प्राणी आपणांस किती उपयोगाचे आहेत?

आ०— वास्तविक मुला, कां कीं एक ग्रंथकार असें ह्मणतो कीं 'जरी यांचा पराक्रम सिंव्ह आणि हत्तीपेक्षां कमी आहे तथापि

उपयोगाचीं कामें करितात.

**रा०**— आई, या प्राण्यांइतक्या बारीक व चमत्कारिक वनस्पतीहि असतील ?

**आ०**— मुला, जसजसे शोध करीत जावें त्या त्याप्रमाणें वनस्पतींत नवेनवे चमत्कार दृष्टीस पडतात; मग बुरसी, किंवा शेवाळ ज्यांस बारीक वनस्पती ह्मणतात त्या अथवा मोठमोठ्या वनस्पतींचे निरनिराळे भाग तपासून पाहा.

**रा०**— मला वाटतें वनस्पती किती लहान असली तरी तिला निरनिराळे सर्व अवयव असतील.



पानाच्या वाहिनी.

**आ०**— होय; आणि आंब्याच्या झाडांची अथवा मोठाल्या माडताडांचीं इंद्रियें सुंदर असून आपलीं कामें जशीं बरोबर चालवितात, तशींच त्या पानाचीहि चालवितात. सूर्यफुलाच्या कळ्या जशा अव्यंग असतात तशा बटमोगऱ्याच्याहि असतात.

**रा०**— आहा ! तुझ्या सूक्ष्मदर्शक यंत्रांत गुलाबाच्या व





बटमोगऱ्याच्या कळ्या तूं वारंवार दाखविल्यास त्या किती सुंदर दिसत होत्या.

**आ०**— वनस्पतीच्या प्रत्येक भागांत रस पोहंचविण्याकरितां जी तजविज केली आहे ती सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिली ह्मणजे रस नेण्याच्या ज्या बारीक वाहिनी पानाच्या प्रत्येक बाजूवर जाळीदार कामासारिख्या पसरल्या असतात आणि मोठ्या व्यवस्थेने देठासीं वळून गेलेल्या असतात त्या सर्व अगदीं स्पष्ट दिसतात.

**रा०**— सर्व वनस्पतीच्या रसवाहिनी सारिख्या नसतील.



द्राक्ष वेलीच्या
रसवाहिनीचा भाग.



सरल झाडाचे
रसवाहिनी भाग.

**आ०**— नाहीं; कीटकांच्या पाखांच्या शिरा जशा परोपरिच्या आहेत तशाच ह्या आहेत. जेव्हां म्या निरनिराळ्या झाडांच्या व वनस्पतीच्या बुंदाच्या बारीक कापलेल्या चकत्या सूक्ष्मदर्शक

आश्चर्य वाटलें; प्रत्येकांत सारखेपणा इतका दिसला कीं जसें कोणी ह्मणेल ते बारीक विणलेले कापडाचे अथवा फितीचे नमुनेच आहेत. पानाचे पातळ तुकडे पाहिले त्यांतहि तसाच चित्रविचित्रपणा दिसून आला.

रा०— आई, बारीक जीव थोडकेच दिवस वांचतात हें जसें आपणांस वाटतें तसें कदाचित त्यांस वाटत नसेल.

आ०— बहुतकरून नसेल मुला, पाहा ते आपलीं घरें तयार करितात, आपल्या कुटुंबाच्या पाळण पोषणाची तजविज करून ठेवतात आणि तितक्या अल्प काळांत संसाराचीं सर्व कामें करितात; तर यावरून ज्यासाठीं त्यांस उत्पन्न केलें तें करून ते कृतकृत्य झाले असें दिसतें.

रा०— मला असें वाटतें कीं त्या अति सूक्ष्म प्राण्यास पाण्याचा थेंब एक मोठि पृथ्वीच भासत असेल.

आ०— वास्तविक! आपणास कोणत्याहि वस्तूचें अनुमान करणें झालें तर ती दुसरे वस्तूबरोबर ताडून करितो ह्मणून त्या प्राण्याच्या लहानशा बुद्धीस मोठ्या स्थलाचें अथवा दीर्घ आयुष्यांचे काय सुख आहे हें समजणार नाहीं. वेळेची नुसती झुळूक त्यांस एका शतकाप्रमाणें व थोडकेसें जें आकाश दिसतें तें सर्व जगाप्रमाणें वाटत असेल.

रा०— गरीब बिचारे प्राणी, त्यांचें आयुष्य किती लवकर सरून ते मरण पावतात; त्यांस क्षणभर दुःखें असलीं तर त्यांविषयीं त्यानी अगदी त्रासू नये.

आ०— आणि प्रिय मुला, ते पुण्यशील, ज्ञानव्यक्ती, जे स्वर्गांतून आपला सर्व व्यवहार पाहतात तेहि आपणाविषयीं असेंच ह्मणत असतील; कांकीं अनाद्यंत्वासीं जोडून पाहिलें तर मनुष्याचें मोठें आयुष्य किती क्षणिक दिसतें.

रा०— बरें तर आई, ईश्वराच्या दृष्टीने आपलें आयुष्य किती लहान आहे हें मी लक्षांत ठेवीन.

**आ०**— राबट, तुझ्या मतें आपलें पृथ्वीवरील आयुष्य, कां कीं शास्त्रांत सांगितलें आहे कीं आत्मा अक्षय राहतो, ह्मणून अनादिपणाचें साधन करण्यासाठीं जर हा एवढाच काळ असला तर मग त्राता जो भगवान त्याच्या सेवेंत किती तत्पर असावें. प्रभू! आमच्या आयुष्याचे दिवस मोजायास आह्मास असें शिकीव कीं आह्मी आपलीं अंतःकरणें तुझ्याच ध्यानीं लावूं.



रम्यदर्शन अथवा प्रकृतीचे रंग.

पावसाळा सरल्यानंतर राबट आपल्या आईबरोबर दूरदेशीं प्रवास करायास निघाला; मार्गांत त्याने पुष्कळ नवेनवे चमत्कार पाहिले; पुरातन किल्लयांचा साहजिक भव्यपणा व हालींच्या माहालांचें नवीन सौंदर्य यांतील भेद पाहून त्यास फार संतोष वाटला. हा जितका फिरलेला होता तितके याच्या वयाचे मुलगे थोडकेच फिरले असतील.

एक दिवस तीं एका श्रीमंताच्या महालांत सुंदर चित्रांचे आरसे लावले होते ते पाहावयास गेलीं. राबट यास त्या चित्रांची खुबी कांहींच समजली नाहीं, परंतु त्याची आई व तिचे मित्र फारच तारिफ करून बोलूं लागले कीं, असे उत्कृष्ट चितारी तर मरून गेले परंतु त्यांचीं कृत्यें व कीर्ति अजून राहिली आहे. असीं तीं बोलत बसलीं आहेत तंव हा लहान मुलगा खालीवर एका खोलींतून दुसऱ्या खोलींत परोपरिचें सामान ठेवलें होतें तें हळुच पाहत चालला; कांहीं सामानावर सोनेरी रंग दिसत होते, कांहींकांवर किरमीजी, असमानी, आणि हिरवा, आणि कित्येकांस पांढरे किनखाबाचें आच्छादन केलें होतें व त्यावर तरतऱ्हेच्या फुलांचा कसिदा काढून तेजस्वी छाया वेगवेगळाल्या दाखविल्या होत्या.

पाहतां पाहतां शेवटीं या मुलाचें डोकें आणि डोळे दुखूं लागले, इतक्यांत त्याचे आईने त्यास हाक मारून सांगितलें मुला, आपली मंडळी रमणा व परदेशांतील चमत्कारिक झाडें लावलीं आहेत तीं पाहावयास आतां जाणार, हें ऐकून त्यास फार आनंद



वाटला. मग तेथें जाऊन झाडापानांत फिरल्यावर त्याला हुशारी आली; चाहाचीं व काफीचीं रोपें; ऊस, तंबाखु, नारिंग, आणि निंबवाचीं झाडें, शिवाय मसाल्याचीं व दुसरीं फळझाडें ज्यांचा उपयोग त्यास बहुतेक ठाऊक होता तीं पाहून त्याचें मन रमलें.

तेथें एक पक्ष्यांची शाळा आणि मत्स्यांचें तळेंहि होतें, त्यांत पृथ्वीच्या सर्व भागांतील सुंदर पक्षी आणि तरतऱ्हेचे मत्स्य पाहून त्याला मोठी मौज वाटली.

आईचा हात धरून त्या नरम कुरणावरून उड्या मारीत चालला आहे, आणि ह्मणतो, "आई घराबाहेर घडी घडी फिरायास निघाल्यानें जिवास किती समाधान वाटतें!

**आई.**— कां बाबा घरांत तुला फार गरमी करीत होती?

**राबट.**— छी, नाहीं. पण माझे डोक्याला टक लागलें आणि डोळे इतके चुरचुरूं लागले कीं माझ्यानें पाहावेनासें झालें.

**आ०**— तर तूं तीं चित्रें इतक्या हौसेनें कां पाहत होतास?

**रा०**— नाहीं. मला तीं फारच आवडलीं परंतु तीं कोणत्या कामाचीं आहेत हें थोडकेंच समजलों ह्मणून सुंदर खुर्च्या, मेज, गालीचे आणि पडदे पाहत होतों.

**आ०**— बरें, तेणेंकरून तूं आपली कर्मणूक केलीस हें पाहून मला फार संतोष झाला.

**रा०**— पण आई, त्या जिनसा पाहून मला इतका कंटाळा कां आला बरें? कांकीं आबड धोबड जिनसांपेक्षां सुंदर जिनसा पाहिल्यानें फार हर्ष वाटावा.

**आ०**— मला वाटतें त्या खोल्यांस झालर लावली होती तिच्या चकचकीमुळें तुझ्या डोळ्यांस विकार झाला असेल.

**रा०**— असें कसें ह्मणतीस? माझे डोळे तर अगदी तुझ्या डोळ्यासारिखेच आहेत.

**आ०**— जरी ते माझ्या किंवा दुसऱ्या पुष्कळ लोकांच्या डोळ्यासारिखे असले तथापि कित्येक रंगानें त्रास होतो कित्येक रंगानें होत नाहीं.

नव्हती.

**आ०**— बहुतकरून ऐकिली नसेल खरी; परंतु जरा आठवण करून पाहा कीं जेव्हां महालांत होतास तेव्हां तुला कसें वाटत होतें बरें? तुझ्या दृष्टीला कोणती खोली रम्य दिसत होती?

**रा०**— बये, मला अमळ विचार करूं दे. ती बैठकीची खोली जिच्या भिंतीला पिवळा रंग लावला होता ती मला वाटतें सर्वांपेक्षां तेजस्वी आणि उमदा दिसत होती.

**आ०**— खरी, पण पाहा कीं, सारा दिवस बसायाचें आहे तर तुला कोणती खोली रम्य वाटेल.

**रा०**— (विचार करून ह्मणतो) किरमिजी? आहा, नाहीं, त्यांत मी जरा बसलों नाहीं इतक्यांत माझ्या डोळ्यांस आग सुटली. आई मला वाटतें ज्या खोल्यांत फार अस्मानी किंवा हिरवे रंग दिसत होते, त्या अति रम्य असाव्या; कां कीं जेव्हां मी दुसऱ्यांतून निघून त्यांत गेलों तेव्हां मला आराम वाटलें, आणि माझें डोकें दुखत होतें तें बहुतेक बरें झालें.

**आ०**— मुला, याविषयीं मला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं, कां कीं मनुष्याच्या डोळ्यांची रचना असी आहे कीं फार उजेड किंवा तेजस्वी रंग असले तर त्यांस लागलाच त्रास होतो.

**रा०**— आई, या सुंदर हिरव्या चारीनें माझ्या डोळ्यांस अगदी अपकार होत नाहीं.

**आ०**— कसा होईल बरें, ईश्वरानें सृष्टींतील रंग असे केले आहेत कीं तेणेकरून आपल्या नेत्रांस सुख व समाधान व्हावें तर हा त्याच्या शक्तीचा व ज्ञानाचा एक दाखला आहे असें समज.

**रा०**— तसें मी कधीं पाहिलें नाहीं.

**आ०**— काय राबट, तूं कधीं पाहिलें नाहींस? मला वाटतें तूं पाहिलें अससील, पण त्याकडे लक्ष दिल्हें नाहींस. चारीचा हिरवा रंग किती रम्य आहे असें तूं नुकतेंच ह्मटलेंस ना?







**रा०**— होय; तसेंच कोंवळ्या अस्मानी रंगाच्या आकाशाकडे पाहिल्यानें माझ्या डोळ्यांस कधीं त्रास होत नाहीं.

**आ०**— ठीक; आणि फुलांच्या रंगांचीहि अशीच गोष्ट आहे तेणेंकरूनहि नेत्रास कधीं विकार होत नाहीं.

**रा०**— फुलें किती सुंदर रंगलेलीं असतात याविषयीं म्या पुष्कळदां विचार केला आहे, जेव्हां त्यांवर दोन तीन रंग असतात तेव्हां त्यांची रचना जसी सफाईदार दिसती तसी नुसता एकच रंग असल्यानें दिसत नाहीं.



**आ०**— वास्तविक; सदाफुलीवरचा किरमीजी आणि जांबळा रंग किंवा गुलबासीच्या फुलाचा पांढरा तांबडा आणि पिवळा, अथवा कमळावरचे सुंदर रंग किंवा गुलाबाचे मधुर नाजूक रंग यांची किती मौज दिसती.

**रा०**— तसीच आई, त्यांच्या हिरव्या पानामुळें त्यांस

अधिक शोभा येती; आणि मला वाटतें, एकादें फूल सारेंच गुलाबी किंवा नुसतें अस्मानीच असलें तर हिरव्या पानानें जी शोभा दिसती त्याचा अर्धपटहि दिसणार नाहीं.

**आ०**— तें खरेंच; आणि जेथें एकच रंग असेल तेथें जसा हिरवा दृष्टीला सौम्य वाटेल तसा दुसरा कोणता वाटणार नाहीं.

**रा०**— एक सारें शेत जर दाट भरलेलें असलें तर त्यांत आपण दुसरा रंग कधीं पाहत नाहीं. काय आई, पाहतों?

**आ०**— होय पाहतों; प्रवासांत आपण तांबड्या कोईचीं शेतें पुष्कळ पाहिलीं आहेत; तसींच पिवळ्या, तांबड्या, जांबळ्या फुलांचीं आणि अस्मानी जवसाचींहि पाहिलीं आहेत.

**रा०**— तर आपण पाहिलीं आहेत, पण मला वाटतें त्यांत अस्मानी रंगाची जवस फारच सुंदर दिसली. दुसरीं शेतें चमत्कारिक होतीं खरीं, परंतु तीं पाहतां पाहतां माझ्या डोळ्यांस जितका लवकर त्रास आला तितका त्या फिकट रंगाच्या जवसीनें आला नाहीं.

**आ०**— तर मुला, ईश्वरानें तांबड्या किंवा नारंगी रंगाचें आकाश करण्यापेक्षां अस्मानी केलें ही त्याची आपणावर केवढी कृपा समजावी.

**रा०**— आहा आई, तांबड्या आकाशानें मोठा त्रास झाला असता. पाहा सूर्य मावळतो त्यावेळीं जे तेजस्वी रंग दिसतात त्यांकडे देखील माझ्यानें पाहवत नाहीं; आणि आई त्या दिवशीं रात्रीस आग लागली होती तेव्हां आकाश लालभडक पाहून मी अगदींच भिऊन गेलों.

**आ०**— बरें, नारंगी रंगाचें आकाश तुला कसें वाटतें?

**रा०**— त्या महालांतल्या पिवळ्या रंगाच्या खोलींत माझ्या डोळ्यांस त्रास झाला तसा होईल, तर तेंहि मला आवडणार नाहीं.

**आ०**— आणि पांढऱ्याविषयीं तुला काय वाटतें? कित्येक देशांमध्यें स्नोबर्फ कधीं कधीं महिनेंचेमहिनेपर्यंत एकसारिखें पडतें. तें पांढरें फटफटित दिसत असतें.

**रा०**— आई, तें मला सांगवत नाहीं, तुला समजतें ?

**आ०**— बाबा, या देशांत स्नोबर्फ पडत नाहीं तरीं दुसरे लोक जें सांगतात त्यावरून मी अटकळ करितें आणि मला आठवण आहे कीं, जान रास साहेब आणि दुसरे प्रवाशी असें सांगत कीं जेव्हां ते धृवाजवळच्या देशांत राहत होते तेव्हां स्नोबर्फानें त्यांचे डोळे वारंवार दिपून जात.

**रा०**— आई, मला वाटतें त्यांचे डोळे स्नोबर्फाच्या पांढऱ्या रंगामुळें दिपत असतील.

**आ०**— तें एक कारण आहे; परंतु सूर्याच्या प्रकाशानें फारच दिपून जात. दिवसास आकाशांत ढगें आलेलीं असलीं तरी स्नोबर्फानें अंधत्व येतें या भयास्तव त्यांस नेहमी दिवसास घरांत राहून रात्रीचा प्रवास करावा लागे.

**रा०**— आई, आपल्या डोळ्यांस काळा रंग कसा काय पडेल बरें ?

**आ०**— जे लोक काळे कपडे फार शिवीत असतात त्यांस विचार ह्मणजे त्यांस केवढी इजा होती ती तुला सांगतील.

**रा०**— असें काय! तर मग तूं काळ्या रंगाचें काम करतीस तेव्हां तुला तसेंच होत असेल.

**आ०**— होय; इतकें कीं तें काम मला तसेंच ठेवावें लागतें, पुढें चांगलें ऊन पडल्यावर तें फिरून काढितें.

**रा०**— आपण काळीं किंवा अंधुक रंगाचीं फुलें फारसीं पाहत नाहीं.

**आ०**— नाहीं, खरें; आणि पाहा मोहोर देखील काळा असतो तोंपर्यंत हिरव्या रंगाच्या पानांनीच शोभला जातो. वादळ व्हावयाचें असतें त्यावेळीं आकाशांत जेव्हां काळीं ढगें जमतात तेव्हां सारें जग किती भयंकर दिसतें बरें ?

**रा०**— आणि रात्रीसहि चंद्र किंवा तारा नसल्या तर आंधार पडून मोठें भयान दिसतें.

**आ०**— तूं ह्मणतोस तें खरें; उजेडांत आपल्या डोळ्यांस कांहीं तरी करायाचें असतें. आणि काळोख ह्मटला तर दिवसाचें

पुष्कळ मनुष्यांस काळोखांत जसी गाढ निद्रा येते तसी दिवा जळत असतां किंवा तीनसांजा येत नाहीं.

**रा०**— आपल्याला सूर्याकडे पाहवत नाहीं त्यावरून मला वाटतें कीं आपले डोळे असलें तीक्ष्ण तेज सहन कराया जोगते केले नाहींत.

**आ०**— नाहीं, तें तेज आपणास व पक्ष्यांसहि तसेंच तीक्ष्ण आहे; दूरदूरचे तारे मोठ्या दुरबिणींतून पाहिले तरी त्यांच्या तेजाने आपले डोळे दिपतात.

**रा०**— विल्यम हर्षल साहेब, सैरस नामक तारा पाहत असतां त्यांचे डोळे कसे दिपून गेले त्याविषयीं तूं जें कांहीं सांगितलें त्याची मला आठवण आहे. पण आई, कुररांस सूर्याचें तेज सोसवत असेल असें मला वाटतें.

**आ०**— त्यांच्या डोळ्यांची रचना आपल्या डोळ्यापेक्षां वेगळी आहे. सेक्रेटरी पक्ष्यासारिखे कित्येक पक्षी आहेत त्यांस डोळ्याच्या वरल्या आंगीं पडदा असतो, तो सूर्याकडे पाहण्याच्या वेळीं ते खालीं ओढून घेतात.



किंचित पडदा ओढलेला, सेक्रेटरी पक्ष्याचा डोळा. मांजरांस दाट काळोख असला तरी त्यांतून पाहतां येतें; तसेच कीटक वगैरे जे





बहुतकरून लिकून राहतात, त्यांस कामापुरतें काळोखांत बेरेंच दिसतें.

रा०— आई, तुला आठवण आहे, तूं मला सांगत होतीस कीं उंच पर्वताच्या शिखरावर जे लोक जातात त्यांस श्वासोश्वास टाकण्यास फार कठीण पडतें; तर कदाचित त्यांस तेथें पाहण्यासहि कठीण पडत असेल?

आ०— मुला, प्रवासी लोकांना आपल्या दृष्टींत फेरफार अनुभविण्याचे पुष्कळ प्रसंग आले आहेत. मांटब्लांक पर्वतावर जीं मनुष्यें हिम्मत धरून पहिल्याने चढून गेलीं तीं कांहीं दिवसपर्यंत अगदीं आंधळीं झालीं होतीं.

रा०— कशाने बरें?

आ०— त्याविषयीं ते पुष्कळ कारणें सांगतात. स्नोबर्फाने डोळे दिपतात हें एक कारण; दुसरें असें आहे कीं ईश्वराने आपल्या डोळ्यांत पाण्याचा अंश ठेविला आहे तो तीक्ष्ण वायुने सुकून गेला असतां तसें घडतें; याशिवाय पातळ वातावर्णाच्या योगानें प्रत्येक पदार्थ फटफटित दिसतो तेणेकरूनहि नेत्रांस फार विकार होतो.

रा०— आई, त्यांचे डोळे बिघडले होते ते मग बरे झाले कीं नाहीं?

आ०— होय, कांहीं दिवसानी बरे झाले; परंतु त्यांची नजर बरीच मंद झाली ह्मणून आतां प्रवासी लोकांस उंच पर्वतावर चढायाचें असल्यास ते आपले डोळे चसम्याने किंवा पडद्याने झांकतात.

रा०— आई, कित्येक रंग पाहिल्यामुळें आपल्या डोळ्यांस जसा त्रास होतो तसा बारीक पदार्थ पाहिल्याने होतो.

आ०— खरेंच मुला; ईश्वराने आपल्या स्थितीस इंद्रियें जसीं असावीं तसींच दिल्हीं आहेत आणि तीं मोठीं आश्चर्यकारक आहेत तथापि त्यांस कांहीं मर्यादा आहे हें वारंवार समजून येतें.

रा०— आई, आपण नुकतेंच त्या घरांत चमत्कारिक पदार्थ पाहत होतों तेव्हां बारीक बारीक जीव आणि शिंप्या सूक्ष्मदर्शक-

पाहूं लागलों तों तेणेंकरून माझ्या डोक्यास टक लागली.

**आ०**— मुला, दुरबिणीनें एकसारिखें पाहत असलों अथवा दूरचे पदार्थ निरखून पाहूं लागलों तरीं तसेंच होतें.

**रा०**— पण आई, तुला तर अगदीच दिसणार नाहींत अशा दूरदूरच्या जिनसा मला दिसतात.

**आ०**— मुला, प्रत्येक मनुष्याचे डोळ्यास स्वभाविक अग्रांशु असतो; त्याच्या योगानें अमुक अंतरावर पदार्थ असले तर साफ दिसतात आणि हा अग्रांशु निरनिराळ्या माणसांस निरनिराळा असतो. जेव्हां तूं माझ्या चसम्यांतून पाहतोस तेव्हां तुला चांगलें दिसतें काय?

**रा०**— नाहीं आई; मला चसम्यावांचून अधिक चांगलें दिसतें.

**आ०**— तसेंच तुला व तुझ्या वडिलाला कोणत्याहि दुर्बिणींतून जसें दिसतें तसें मला दिसत नाहीं, ह्मणून जेव्हां मी दुर्बिणींतून पाहतें तेव्हां मला त्यांतील काचाचें स्थळ बदलावें लागतें.

**रा०**— तर हें चमत्कारिक आहे!

**आ०**— राबट, तें चमत्कारिक इतकेंच नाहीं. परंतु उपयोगाचेंहि आहे, पाहा त्यामुळें निरनिराळीं माणसें आपलीं निरनिराळीं कामें करायास लायक होतात. कोणी या जगांतल्या मोठमोठ्या व दूरच्या विषयांचा शोध करितात; कोणी अति सूक्ष्म प्राणी ज्यांस अगदीं जवळून पाहिलें पाहिजे त्यांचा शोध लावितात. मी आपल्या डोळ्याजवळ बारीक तंतू किंवा बारीक ठशाचें पुस्तक धरून पाहूं लागलों तर तुझ्यापेक्षां मला तें चांगलें दिसतें, एकादें लहान अक्षराचें पुस्तक डोळ्याजवळ धरून जितकें वाचीन तितकें मोठ्या अक्षराचें पुस्तक दूर धरून वाचवणार नाहीं आणि तसें करूं लागलें तर उलटा कंटाळा येईल.

**रा०**— आजीला चसम्याशिवाय दिसत नाहीं हें कसें?



आणि संध्याकाळीं काळोख पडला ह्मणजे तिला आपल्या डोळ्यांस विश्रांति द्यावयास इतका उल्हास कां वाटतो बरें?

**आ०**— मुला, लोक जसजसे ह्मातारे होतात तसतसे त्यांचे डोळे पालटतात. कित्येकांस तरुणपणांपेक्षां ह्मातारपणांत चांगलें दिसतें; आणि कित्येकांस तरुणपणांत दिसतें तसें ह्मातारपणांत दिसत नाहीं; याचें कारण मी तुला समजवायास लागलीं तरी तुला तें समजणार नाहीं. ऐक ऐक! रिचड काका आपणास पक्ष्यांची शाळा पाहावयास बोलावीत आहे.

हीं दोघें हें वरील संभाषण करीत एका हिरव्याचार मांडवाखालीं बसलीं होतीं आणि बाकीची मंडळी एका उंच किल्ल्यावर चढून आसपासचा प्रदेश पाहायाला गेलीं होतीं; त्याची आई आपल्या कमनजेरमुळें ही मौज पाहावयास गेली नाहीं, आणि राबट याचें डोकें दुखत होतें ह्मणून त्यास आपल्या आईजवळच



राहावयास बेंर वाटलें. आतां त्यास समाधान वाटून तो मोठ्या हुशारीने उठला आणि सुंदर पक्षीशाळेंत परदेशांतील अपूर्व पक्षी ठेवले होते त्यांचा चमत्कार पाहावयास चालला; तेथें त्यानें कांहीं पक्ष्यांच्या डोकीवर सुंदर तुरे, व कांहींकांच्या मानेला पिसांच्या

सांगितलें होतें तितकें फार लक्ष लावून पाहिलें.

चीनई कोंबडे, अमेरिका देशांतले पोपट, आणि गुंगणारे पक्षी यांचीं सुंदर पिसें पाहून ह्मणतो, आहा! किती सुंदर प्राणी! खचीत, यांच्या रंगाची पराकाष्ठा आहे.

**आ०**— प्रिय मुला, निरनिराळे जातीच्या पक्ष्यांस कसकसे रंग व सफाईदार छाया असाव्या त्याची योजना किती च्यातुर्यानें केली आहे हेंहि ध्यानांत ठेव.

**रा०**— मला वाटतें लहान पक्षी सर्वांपेक्षां अधिक तेजस्वी आणि सुंदर दिसतात.

**आ०**— बाबा, ईश्वरानें च्यातुर्येंकरून आपल्या प्राण्यांची व्यवस्था कसी केली आहे त्याविषयीं मागें जें तुला सांगितलें त्याला हें अनुसरून आहे असें दिसतें; पाहा कीं, तेजस्वी रंग थोडका असला तर त्याची मोठी शोभा आहे आणि तोच फार झाला तर नेत्रांस त्रास उत्पन्न करितो. मुला, आपण तांबड्या रंगाचा हत्ती किंवा नारंगी रंगाचा सिंह कधीं ऐकिला आहे?

**रा०**— छी, नाहीं, नाहीं! मला वाटतें, त्यांचा जो रंग आहे तोच चांगला दिसतो.

**आ०**— खरें; आणि तेजस्वी रंगापेक्षां हे रंग त्यांच्या शत्रूची दृष्टी चुकवायास मोठे उपयोगाचे आहेत.

**रा०**— पण आई, मी एक मोठी पांढरी आस्वल पाहिली हें कसें बरें?

**आ०**— पण ती कोठून आली हें तुला ठाऊक आहे?

**रा०**— तिला ध्रुव आस्वल ह्मणतात, यावरून ती उत्तर ध्रुवाकडून आली असेल.

**आ०**— होय तिकडून; आणि त्यामुळेंच तिच्या झिप्र्या पांढर्‍या असतात तेणेंकरून ती दृष्टीस न पडतां आपला भक्ष्य शोधीत स्नोबर्फावरून सरकत सरकत चालती.

**रा०**— असें आहे काय आई?

**आ०**— होय; मुला, सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणारे



असें सांगतात कीं, जनावराच्या रंगाने त्यांचें संरक्षण होणें हा एक ईश्वराच्या चांगुलपणाचा आणि ज्ञानाचा दाखला आहे.

**रा०**— आई ! पण मला उघडून सांग.

**आ०**— पाहा, आपल्या साधारण कोंबड्या आणि कवडे बहुतकरून फार अंधुक रंगाचे असतात आणि ते जर जमीनीला अगदीं लागून बसले तर आकाशांत घारीस व कुररांस आपला भक्ष्य अमुकच ठिकाणीं आहे त्यावर बरोबर नेमाने कसें उतरावें हें समजणार नाहीं.



ध्रुव प्रदेशांतली पांढरी आस्वल.

**रा०** — पण जर ते हालले चिलले तर घातक पक्षी त्यांस पाहणार नाहींत ?

**आ०**— पाहतीलच; परंतु ईश्वराने त्यांस साहजिक ज्ञान दिल्हें आहे तेणेंकरून शत्रु जवळ येण्याची त्यांस सुचना होती; आणि अशा प्रसंगीं संकट दूर होईपर्यंत ते शेतांत निपचित पडत असतात हें तर तूं पुष्कळदां पाहिलें अससील मुला.

रा०— आई तें मी पाहिलें खरें; पण ते दुसऱ्या पक्ष्यांस ठकवायास मेल्याचें सोंग घेतात असें मला वाटलें.

आ०— नुसतें मेल्याचें सोंग घेतलें ह्मणून भुकेली घार असा चांगला भक्ष्य सोडील असें मला वाटत नाहीं; परंतु कोंबडीं, बर्तीं तसें करितात. त्याचें कारण असें सांगतात कीं तीं घातक पक्ष्यांची दृष्टी अगदींच चुकवून टाकण्यासाठीं करीत असतील.

रा०— हा मोठा चमत्कार आहे. आई पुष्कळ लहान पक्ष्यांस झाडाच्या बुंदासारिखीं अंधुक रंगाचीं पिसें असतात तर मग तीं अशासाठींच असतील असें मला वाटतें.

आ०— होय बहुतकरून तेंच कारण असेल; कां तूंच वारंवार ह्मणत असतोस कीं बागेंतील गोगलगाया लांकडाच्या गाठीसारिख्या दिसतात ह्मणून त्या माझ्या दृष्टींत भरत नाहींत.

रा०— खऱ्याच दृष्टींत भरत नाहींत. शेतांत मला कुपणावर ज्या गोगलगाया सांपडतात त्यांसारिख्या ह्या सुंदर असल्या तर किती चांगलें होतें.

आ०— परंतु त्या देखील शोध केल्याशिवाय सांपडायाच्या कठीण, कां कीं त्या ज्या फुलांच्या आसऱ्यानें राहतात त्यांसारिख्याच दिसतात.

रा०— अरेरे! त्या लहान हिरवे रंगाच्या कीटकानीं माझे केवढे गुलाब खाऊन नासून टाकले; त्यांचा मी फार शोध करीत होतों परंतु ते कोठे मला सांपडेनात. यावरून त्यांचा रंग गुलाबाच्या पानासारिखा आणि देटासारिखा असेल असें मला वाटतें.

आ०— क्रांति वृत्तांतील प्रदेशांत लहान वांकड्या काठीसारिखें कांहीं पडलेलें असलें तर तें लागलेंच उचलायास जाऊं नये किंवा झाडाचे डाहाळीसारिखे कांहीं दिसत असलें तर त्यावर बसूं नये कां कीं तसें केल्यानें पुष्कळ मनुष्यें संकटांत पडलीं आहेत.

रा०— तें संकट कोणतें आई?

आ०— ऐक. एका दिवशीं मी आस्त्रेलिया देशांतील एका बाईची गोष्ट वाचीत होतें; तिनें शेवाळानें भरलेली एक झाडाची

डाहाळी पाहिली तेव्हां तिला वाटलें कीं ही सुंदर डाहाळी कशाची आहे ती आपण पाहावी या हेतूने ती हातांत घेऊन पाहते तंव चित्रविचित्र रंगाचा विखारी साप.

**रा०**— आई, तो तिला चावला काय?

**आ०**— नाहीं, चळवळ करून दैवयोगाने तिच्या हातांतून निसटला इतक्यांत माळ्याच्या दृष्टीस पडतांच त्याने त्यास आपल्या पावड्याने मारून टाकलें.

**रा०**— परंतु आई ती झाडाची डाहाळी ह्मणालीस तें काय होतें बरें?

**आ०**— आर किंवा शब्दवाहक या जातीचे मोठाले साप असतात ते हालले चिलले नाहींत तोंपर्यंत साप आहेत असें कोणाला वाटत नाहींत. याप्रमाणें मगरहि न ओळखतां कित्येक जण त्यांच्या जवळ जाऊन आयतेच त्यांच्या कवेंत सांपडले आहेत.

**रा०**— आई, मला तर मगर पहिल्याने मारून टाकावे असें वाटतें.

**आ०**— निःसंशय वाटत असेल मुला, परंतु त्यांच्या अंधुक रंगावरून तो लोकांच्या नद्रेंत फारसा येत नाहीं. कित्येक जनावरें असीं आहेत कीं तीं निरनिराळे पदार्थांत जसजसीं फिरतात तसतसी त्यांस आपले रंग फिरविण्याची शक्ति असती.

**रा०**— हा तर मोठाच चमत्कार आहे. आई असें जनावर तर कोणतें आहे?

**आ०**— पाहा मुला सरडा वेगवेगळाले रंग धरून वापरतो. ज्या पाल्याचे असऱ्यास त्याला राहावयाचें असतें तसा तो आपला रंग फिरवितो त्यामुळें तो आपल्या नद्रेंत येत नाहीं.

**रा०**— बरें आई, ज्या जनावरांस असे अंधुक रंग आहेत ते त्यांच्या किती उपयोगी पडतात तें मी आतां समजलों, ह्मणून पहिल्यापेक्षां मी त्यांची आतां अधिक तारिफ करीत जाईन.

**आ०**— तसेंच स्नोबर्फाच्या देशांत हिंवाळा आला ह्मणजे सर्व जनावरांचा रंग बदलून पांढरा होतो; ह्मणून जान रास साहेब

व त्याचे बरोबरीचीं मनुष्यें यानी कोल्ह्याचे व आस्वलीचे आंगावरील केस पांढरे होतांना पाहिले ह्मणजे लागलेंच अनुमान करीत कीं आतां तीक्ष्ण हवा निघेल.

**रा०**— लोकांस पांढऱ्या लोकरीचीं जनावरें धरायाचीं असलीं तर मला वाटतें कीं ते त्यांची पारध हिंवाळ्यांत करीत असतील.

**आ०**— होय, उत्तर धृवाजवळ पांढरे कोकडे आणि दुसरीं कांहीं जनावरें जीं हिंवाळ्यांत धरतात त्यांचे केस नाजुक व स्नोबर्फासारिखे पांढरे असतात आणि त्याला किमतहि फार येती. काळ्या रंगाचे कोकडांचे केस उन्हाळ्यांत फार शोभिवंत दिसतात परंतु हिंवाळा आला ह्मणजे ते अगदी फिके पडतात.

**रा०**— आणि धृवांतील पक्ष्याच्या पिसाचाहि रंग बदलतो काय?

**आ०**— होय, तितर आणि दुसरे थोडके पक्षी जे तेथें हिंवाळ्यांत राहतात त्यांच्या पिसांचा रंग बदलतो.

**रा०**— आई, तर मग गुंगणारे पक्षी व सोनकोंबडे हे बर्फांत राहिले तर त्यांचेहि तेजस्वी रंग विटून जातील?

**आ०**— होय, ते थंड देशांतले पक्षी नव्हत ह्मणून त्यांस थंड हवा सोसवत नाहीं. तसींच जनावरें आणि फुलेंहि दोनहि त्यांच्या जन्मभूमींतून काढून नेलीं ह्मणजे त्यांचें स्वभाविक तेज नाहींसें होतें.

**रा०**— तर मला वाटतें आपणास एथें परदेशांतील प्राणी तितके उत्कृष्ट दिसणार नाहींत. बरें, त्यांस तेथें धरून मारलें आणि त्यांच्या पोटांत मसाला भरून आपल्या घरीं आणलें तर मग त्यांचे तेजस्वी रंग बरोबर दिसतील कीं नाहीं?

**आ०**— मला वाटतें दिसणार नाहींत मुला, कां कीं ते जिवंत आहेत तोंपर्यंत त्यांना टवटवी असती, अणखी मी तुला सांगितलें आहेच कीं प्रत्येक पिसाला प्राण्यापासून जिवन मिळतें पण एकदां जर तें उपटून टाकलें तर त्याचें जिवन नाहींसें होईल;

आणि फुलेंहि झाडावरून एकदां खुडलीं ह्मणजे सारीं एकसारिखीं कोमून जातात व त्यांचा रंगहि बहुतेक कमी होतो.

रा०— होय, जीं फुलें मी दाबून ठेवतों किंवा सुकवितों त्यांचा रंग तसा राहत नाहीं; पाण्यांत ठेविलीं तरी तीं लवकर कोमून जातात. अरेरे! असे सुंदर रंग किती थोडका वेळ राहतात, त्यांची नकल करून ते चित्रांत उतरूंपर्यंत राहते तर किती चांगलें होतें?

आ०— ईश्वराचे सुंदर हस्तक्रियेची नकल करायास आपणां मानवांस जितका वेळ लागतो तितका त्यास प्रत्येक फुल अथवा पिस करायास लागता तर मला वाटतें आपणांस जगाचें इतकें सौंदर्य कधींच पाहावयास मिळतेना.

रा०— आई, वनस्पती आणि तसींच जनावरें व कीटक यांस रंगविणारे ऋतु फार वेळ राहत नाहींत.

आ०— खरें मुला, तरी सारें जग किती शोभायमान दिसतें; शिंप्याचे आणि खाणींतल्या पदार्थांचे रंग किती सुंदर असतात ते पाहिलेसना?

रा०— आहा आई, शंबुकाचे आंतलें भाग किती पराकाष्ठेचे सुंदर असतात आणि त्यावर छाया तरी किती नामी असती.

आ०— तसेच फळांचे व मनुष्याच्या शरिराचे मन मोहन करणारे रंग किती हर्ष उत्पन्न करितात. तुझ्या बहिणीच्या गुलाबी गालावर पांढऱ्या व तांबड्या रंगाच्या भेळीने किती सुरेखपणा दिसतो.

रा०— तिच्या ओठांस तेजस्वी तांबडा रंग व डोळ्यांस काळा रंग आहे तेणेकरून ती फार सुंदर दिसती, तसें नसतें तर ती अगदी कुरूप दिसती.

आ०— बाळपणांत हातावर जो चित्रविचित्र रंग दिसतो तोच पुढें तारुण्यांत किती टवटवीत होतो; चितारी लोक तसी सफाई दाखविण्यास फार करितात परंतु त्यांस ती अगदीं साधत नाहीं.

रा०— आई, धर्म पुस्तकांत देवदुतांचे पोशाक जेव्हां तेव्हां पांढरे कां वर्णिले आहेत?

आ०— मुला, त्यांचा पवित्रपणा दाखवायासाठीं, आणि बहुतकरून सर्व लोक पांढऱ्या रंगाचा उपयोग याच कामासाठीं करितात. यावरून पाहा कीं कोणतेहि वस्तूचा मळ धुऊन टाकला ह्मणजे ती स्वस्छ आणि निर्मळ होती तद्वत मुला, तूं ईश्वराला अनन्य भावेंकरून शरण जा, ह्मणजे तो तुझीं सर्व पापें धुवील आणि तुला निर्मळ करून आपला अंकीत करील.



**आ०**— होय; आणि जेव्हां ते खाय खाय करूं लागतात तेव्हां त्यांस चारा पुरवायास त्यांच्या आईबापांना फार मेहनत पडती. जर तूं मैनाचा किंवा गोवी पक्ष्याचा जोडा आपल्या पिल्लांस चारतांना पाहसील तर त्यांस किती पराकाष्ठेचा श्रम करावा लागतो तो पाहून तुला मोठें आश्चर्य वाटेल.

**रा०**— त्यांचे आईबाप त्यांस किती वेळा चारितात?

**आ०**— कोणी एकाने घरकुंड्यांतील पक्ष्यांस चारतांना पाहिलें तो असें सांगतो कीं, प्रत्येक पिल्लास त्याच्या आईबापानी अठ्ठावीस वेळा चारा पाणी आणून दिल्हें; आणि तीं सारीं पिल्लीं पांच होतीं ह्मणून त्या दिवसीं त्या सर्वांकरितां चारा आणायास त्यांस कांहीं नाहीं तरीं पंचवीस कोसांचा हेलपाटा पडला असेल.



पाणकोळी.

**रा०**— गरीब बापडे प्राणी! खरोखर त्यांस फार मेहनत पडली.

**आ०**— जे पक्षी आपल्या पिल्लांस मासे चारतात त्यांस वारंवार फार श्रम करावा लागतो. पाहा पाणकोळी हा पक्षी केवढी मेहनत करितो! तो आपल्या मानेखालच्या सैल पिशवींत

वेळोवेळा मासळी भरून परोट्यांत इतकी जमा करून ठेवतो कीं ती साठ भुकेले मनुष्यांस पुरून उरेल.

रा०— तर मला वाटतें आई इतर पक्ष्यांचे पिल्लांस खावयास जितके कीटक लागतात तितके पाणकोळ्यांच्या पिल्लांस मासे लागत असतील.

आ०— होय कदाचित लागत असतील. माझ्या मुला, गोवी आणि काष्टकोर ह्या पक्ष्यांची असी गोष्ट आहे कीं ते मधमाशा धरण्याकरितां मधीच्या पोळ्याजवळ खेळूं लागतात आणि सारावेळ त्या पोळ्याच्या दरवाज्याकडे टपत राहतात, मग जेव्हां मधमाशा आंत शिरतेवेळीं आपले हात पाय पुसायास बाहेर थांबतात तेव्हां त्यांस टपकन धरून खाऊन टाकतात.

रा०— गोवी पक्ष्यांस तर तसें करितांना म्या पाहिलें आहे, आणि मला वाटतें काष्टकोरांसहि पाहिलें असेल.

आ०— गोवी पक्ष्यास कीटक, आणि काष्टकोरास लांकूड फोडून खावयास आवडतें तथापि ते माशा सांपडल्या असतां सोडीत नाहींत.

रा०— आई, कावळे नवे धान्य खातात, नाहीं बरें? ह्मणूनच मला वाटतें कीं हेनरी हा आपले शेतावरील कावळे जेव्हां तेव्हां गोळी घालून मारवीत असतो.

आ०—सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणारे असें सांगतात कीं, हा त्या गरीब बापड्या कावळ्यांवर उगीच आळ आहे, खरें पाहिलें असतां जे कीटक झाडांचीं मुळें खातात त्यांचा नाश करण्यासाठीं ते उलटे उपयोगी आहेत.

रा०— आई, कुरणांत जेथें ढोरें चरतात तेथें म्या त्यांस पुष्कळदां पाहिलें आहे.

आ०— बाबा, कुरणांत एका जातिची वाईट चार रुजती तिचीं मुळें जे कीटक खातात त्यांस ते कावळे शोधीत फिरतात. ही चार गोवारी आपल्या ढोरांस खाऊं देत नाहींत. कीटक मुळांचा नाश करितात आणि कावळे तर कीटक खाण्या-

सोठा चार ओढून काढतात तेणेकरून तो नाशकारक चार आय-
तीच समुळीं बाहेर निघती.

रा०— पण आई, हे जमीनींत पुरलेले प्राणी कावळ्यांस
कसे समजतात?

आ०— मुला, तो तर मोठा चमत्कार आहे; असें सांगतात
कीं त्यांचें घ्राणेंद्रिय अति तीव्र असतें तेणेंकरून ते आकाशांत
उंच उडत असले तथापि ज्या ठिकाणीं ह्या कीटकांचा भरणा
फार असतो त्याच ठिकाणीं ते अचंबीत झेपा घालतात.

रा०— आई, हेनरी याला असें ठाऊक असतें तर तो काव-
ळ्यांस मारून टाकण्याबद्दल आपल्या शेतांत उलटें राहूं देता.

आ०— खरें, पण हेनरी हा बटाटीं लावीत असतो आणि हें
कावळे तेथें जाऊन चोऱ्या करितात; व नवीं नवीं रोपें खणून का-
ढतात ह्मणून शेतकरी त्यांस भीवविण्याकरितां आपल्या शेतांत
ठिकाणो ठिकाणीं कावळे धरून टांगून ठेवितात तर यांत काय
नवल बरें?

रा०— आई, वसंतऋतु आला ह्मणजे किती लहान लहान
मुलें शेतांत मांडायाचीं बाहुलीं तयार करूं लागतात?

आ०— परंतु मला वाटतें कावळे धान्याला क्वचितच शिव-
त असतील. असें असतांहि शेतकरी त्यांस मारून टाकितात
आणि त्यानी येऊं नये ह्मणून शेतांत जिकडे तिकडे बाहुलीं उभीं
करितात; वास्तविक पाहतां हीं बाहुलीं दोन तीन लहान पक्ष्या-
करितां ठेविलीं पाहिजेत कां कीं जेव्हां कीटक नाहींसे होतात तेव्हां
हे पक्षी येऊन जें धान्य मनुष्यांकरितां लावलेलें असतें तें चो-
रून नेतात.

रा०— आई, एक दिवस मी कांहीं कावळ्यांस मेंढ्यांची लो-
कर तोडतांना पाहिलें आणि त्या मेंढ्यानी त्यांस हाकललें नाहीं
तेणेंकरून मला आश्चर्य वाटलें.

आ०— गरीब बापुडे मेंढे उलटे कावळ्यांचे आभार मानि-
तात, कां कीं त्यांच्या दाट लोकरीमध्यें कित्येक कीटक दडून राह-
तात आणि त्यानां फार त्रास देतात, परंतु हे कावळे त्यांस शो-

एका गाईला तसेंच करीत होतीं तें तुला दाखविलें त्याची तुला आठवण आहेना ?

**रा०**— होय होय; ती पाण्यांत उभी राहिली होती आणि तिच्या पायांवर माशा जमल्या होत्या ह्मणून तिच्या सभोंवतीं बदकें वाटोळीं वाटोळीं पोहत आणि आपल्या गुळगुळीत चोंचीं मारून त्या माशा काढीत तेव्हां ती गाय खालीं मान करून कसी बरें उगीच उभी राहिली होती, कोणी ह्मणेल कीं त्यापासून तिला खरोखरच सुख वाटत आहे.

**आ०**— तिला त्या लहान बदकांपासून फार सुख झालें यांत कांहीं संशय नाहीं.

**रा०**— आई, रिचर्ड काकाच्या बदकाला गोगलगाया फार आवडतात असें वाटतें.

**आ०**— अरे गोगलगाया तर पुष्कळ पक्ष्यांचा मोठा प्रिय भक्ष्य आहे. कित्येक तर त्यानां कवचीसुद्धां साऱ्याच गिळून टाकतात आणि कित्येक मोठ्या चतुराईने त्यांची कवची फोडून गोगलगाया आंतून काढतात.

**रा०**— त्यांस ती कवची कसी फुटती कोण जाणे ?

**आ०**— अरे कांहीं पक्ष्यांच्या चोंची फोडायाजोग्या टणक आणि तीक्ष्ण असतात, आणि कांहीं पक्षी तर मोठ्या उंचावरून त्यांस खाली आपटून फोडतात; असेंच मुला कोणताहि प्राणी आपला यथायोग्य भक्ष्य मिळवायास अडून राहत नाहीं; जर एक उपाय खुटला तर दुसरा करील आणि तो न चालला तर तिसरा करील. याप्रमाणें त्याचें कार्य सिद्ध होईपर्यंत तो प्रयत्न करीत जाईल.

**रा०**— आहा बदक जेव्हां एकादा लांब किड्याला धरतें तेव्हां त्याचा दीर्घ प्रयत्न पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें; तो किडा त्याच्या चोंचींतून निसटून जाण्यासाठीं व्हावा तितका विळवीळ करितो परंतु बदक त्याचें कांहीं एक चालूं न देतां शेवटीं यास गिळून टाकतें.



हाल होतात ते पाहावत नाहीत ह्मणूनच कधीं कधीं माऊ जेव्हां एकादा उंदीर धरती तेव्हां मी तिला बाहेर हाकलून द्यायाला सांगत असतें.

**रा०**— आई, आपली माऊ कधीं मधीं पक्षीहि खाती. तुला ठाऊक नाहीं, कांहीं दिवसांवर खोलीचें दार जरा उघडें पडलें इतक्यांत हेनरी याचा बुलबूल तिनें कसा चोरून नेला.

**आ०**— अणखी मी तुला सांगतें उंदीर ह्मटला ह्मणजे घुबडाचा आवडता भक्ष आहे आणि ससाणे व घारी ह्या तर लहान पक्ष्यांचा काळ आहेत.



डोंबकावळा.

**रा०**— कोकडेंहि हंस आणि कोंबडीचीं पिलीं नाहींसीं करीत असतात.

**आ०**— आणि ते मेंढ्यांसहि मारतात. कुरर आणि गीध हे तरी मुला आपल्या कळपांचे शत्रु होत.

**रा०**— आई, गीध व कुरर हे एवढालीं मेंढरीं आपल्या

खडकांवर असतात.

**आ०**— बाबा, ते त्यांस आपल्या बळकट कवेंत धरून नेतात; आणि पाहा त्यानी लहान मुलेंहि कधीं नेलीं आहेत.

**रा०**— काय तीं खायाला?

**आ०**— होय, कित्येक खाल्लीं आहेत; परंतु पुष्कळ गोष्टी अशाहि लिहिलेल्या आहेत कीं जीं कित्येक मुलें नेलीं होतीं त्यांस कांहीं दुखापत न होतां तीं पुनः जीवंत सांपडलीं. डोंबकावळेहि लहान कोंकरावर झडप घालतात.

**रा०**— पण त्यांना आपल्या घरोट्यांत नेऊन ठेवण्यासाठीं झडप घालीत नसतील?

**आ०**— नाहीं नाहीं, परंतु त्यांचे डोळे काढण्यासाठीं, कां कीं हा भाग त्यांस फार आवडतो. ते स्वतः फारसे बळकट नसतात याजकरितां मेलेले किंवा जे प्राणी मरायास टेकले असतील अ-शांशिवाय दुसऱ्या कोणावर ते झडप घालीत नाहींत.

**रा०**— आई, तूं खरें ह्मणतीस मला आठवण आहे कीं एका डोंबकावळ्याने त्या ह्मातान्या चामरडेलाचे डोळे बाहेर काढले होते.

**आ०**— आणि म्या कोठें कोठें असें वाचलें आहे कीं जंगली लोकांत जेथें मनुष्य बळी देण्याची अजून चाल आहे तेथें पुष्कळ पक्षी प्रेतें खातांना दृष्टीस पडतात.

**रा०**— आई, सिंह आणि वाघ मनुष्याला खातात, ना?

**आ०**— खातात, पण इतर जनावरांपेक्षां त्यांस मनुष्याचें मास अधिक प्रिय आहे असें केवळ नाहीं; ते ह्मसी, बोकड, मेंढे, आणि हत्ती व गेंडे किंवा, कोणतेंहि जनावर जेणेंकरून त्यांचें पोट भरेल, तें मारून खातात.

**रा०**— तशा हिंस्रपशूमधून प्रवास करणें मोठें भयंकर आहे आई?

**आ०**— होय मुला, ही एक मोठी ध्यानांत धरण्याजोगी गोष्ट आहे कीं कांहीं हिंस्रपशू आहेत ते भूक लागती तेव्हांच एकादे



त्यांस अगदी आवडत नाहीं.

रा०— बरें, मी सिंहाच्या ढोलीजवळून गेलों आणि तो जेवलेला असला तर काय तुझ्या मतें तो मला सुखरूप जाऊं देईल ?

आ०— होय, जर त्याचें कुटुंबाहि जेवलेलें असलें आणि तूं त्यास छडलें नाहींस तर तो तुला कांहीं करणार नाहीं; नाहीं तर तुझी चटणी करायास तो कधीं चुकायाचा नाहीं.

रा०— आई, सिंह आणि वाघ हे आपल्या पिल्लांवर प्रीति करितात काय ?

आ०— होहो, इतकी प्रीति करितात कीं त्यांच्या संरक्षणार्थ ते आपला प्राण वेचतील, आणि त्यांस भक्ष्य आणण्यासाठीं पाहिजे त्या प्राण्यास मारावयास मागें पुढें पाहणार नाहींत. आणि हा एक मोठा चमत्कार आहे मुला कीं कांहीं जंगली पशू प्रेतांस शिवत नाहींत.

रा०— कां बरें ?

आ०— त्यांस उष्ण रक्त आवडतें ह्मणून. म्या कांहीं मनुष्याविषयीं असें वाचलें आहे कीं त्यांस हिंस्रपशूपासून सुटून जाण्याचा जेव्हां कांहीं उपाय राहिला नव्हता तेव्हां ते जमीनीवर अगदी निपचीत पडले आणि दम कोंडून त्यानी मेल्याचें हुबेहुब ढोंग केलें मग त्या पशूनी त्यांस कांहीं एक न करितां सोडून दिल्हें.

रा०— बये, कोणतीं जनावरें असें करीत असतात ?

आ०— सिंह, वाघ, आस्वल आणि साप.

रा०— मला वाटतें सापानें एकाद्या प्राण्यास दंश केला तर तो वाचणार नाहीं.

आ०— इतके विखारे साप थोडकेच असतात; परंतु आर ह्मणून जो मोठा साप आहे तो एकाद्या प्राण्याच्या सर्वांगाला वेटोळे घालून आधीं त्याच्या हाडांचा चुराडा करून टाकतो आणि मग पाहिजे त्या वेळीं त्यास गिळतो.

रा०— आहा आई, कितीका जनावरांचा चीरतार्थ एकमे-

आंत नेहमी लढायाच चालल्या आहेत! इतका हा रक्तपात होतो याचा विचार केला, तर आई आंगाला रोमांच उभे राहतात.

**आ०**— पण बाबा, परमेश्वराने असी व्यवस्था करून ठेवली नसती तर ते आपल्याला केव्हांच व्यापून टाकते कां कीं त्यांची उत्पत्ती मनुष्यांपेक्षां फार आहे आणि ते लवकर वाढतात.

**रा०**— आहा! आई तर मग तसें कधीं होऊं नये.

**आ०**— मुला; पशु पक्षी आदिकरून सर्व प्राणी ईश्वराने आपल्या उपयोगासाठीं केले आहेत आणि प्रत्येक प्राण्यास आपला भक्ष्य शोधून कसा काढावा किंवा हिंसा करणें झाल्यास त्वरित सोप्या रितीने कसी करावी हें त्यास शिकविलें आहे.

**रा०**— तें खरें, पण, मांजर उंदिरांना फार दुःख देतें हें कसें?

**आ०**— होय देतें, परंतु एकादां घायाळ केल्यावर त्याला फार वेळ जिवंत ठेवीत नाहीं. एकाद्या प्राण्याला पहिल्याने ठार मारल्याशिवाय त्याचा एक एक तुकडा काढून खातो असें म्या कोणतेहि जनावराविषयीं वाचलें किंवा ऐकलें नाहीं.

**रा०**— आई, माझ्याजवळ एक ख्रिस्ती मंडळीचें लहान पुस्तक आहे तें खरेंच असलें, तर मला वाटतें हिंस्रपशू बरे पण त्यापेक्षां लोक फार क्रूर, कां कीं आपल्या धर्मासाठीं प्राण देणाऱ्यांस त्याही किती पराकाष्ठेच्या यातना दिल्या आहेत.

**आ०**— राबट, ही दुःखाची गोष्ट सांगायास मला फार वाईट वाटतें. मनुष्याने अशा कामाकडे आपली बुद्धि लावली असतां तो यातना देण्यांत व दुसरीं सर्व वाईट कामें करण्यांत मोठा पटाईत होईल.

**रा०**— आई, प्रत्येक कीटक किती उत्कृष्ट केलेला आहे हें तूं आतां मला सांगितलेंस त्यावरून मी समजलों पण हे सर्व प्राणी एकमेकांस खातात याचा विचार करून मला फार दुःख वाटतें. म्हातारे होईपर्यंत त्यानी जीवंत कां राहूं नये व सुख कां भोगूं नये बरे?

**आ०**— मुला, जगाच्या नियंत्याने जी शाहाणपणाने व्यवस्था

डासा विचार करून पाहसील ह्मणजे तुझें तुलाच कळेल कीं जेवढें सुख त्यांस भोगायास योग्य आहे तेवढें त्यांस मिळत असतें.

**रा०**— केव्हां? त्यांस गट करून टाकल्यावर?

**आ०**— नाहीं, ऐक मुला; कीटकांचे किंवा पक्ष्यांचे आंड्यास कांहीं समजत नाहीं ह्मणून त्यांस दुःखहि होत नाहीं; आणि तीं उपजतात तितकीं सारींच वांचलीं तर त्यांस खावयास कांहींच मिळणार नाहीं व तीं उपाशी मरतील.

**रा०**—. उपासानें मरणें हें तर खचित दुःखाचें आणि खिरपणीचें मरण होय.

**आ०**— तशांत तीं वाढलीं तरीं त्यांच्या नियमाप्रमाणें तीं लवकरच मरून जातात. साऱ्यापेक्षां कीटकांस आयुष्य थोडकें दिल्हें आहे; रात्रीस सरदी झाली किंवा हिंवाळ्यांत थंडीचा कहर सुटला, पुरे, ह्मणजे ते लागलेच मरून जातात.

**रा०**— आहा! पक्ष्यानी त्यांस न खाल्लें तर मग ते अधिक दुःख पावतील.

**आ०**— बाबा, मोठमोठीं जनावरें ह्मातारीं होत तोंपर्यंत वांचलीं तर त्यांस सुख भोगण्याची किंवा भक्ष्य मिळविण्याची शक्ति अगदी राहत नाहीं.

**रा०**— त्यांच्याने भक्ष्य कां मिळवणार नाहीं आई?

**आ०**— ज्यांस भक्ष्य मिळवायास जनावराची पारध करावी लागती त्यांस ह्मातारपणीं त्यांवर उडी मारायाची शक्ति राहत नाहीं आणि त्यांचे दांत बोथून जातात त्यामुळें ते चावायाचे उपयोगी पडत नाहींत.

**रा०**— असी अवस्था प्राप्त झाल्यावर काय दुसरीं जनावरें त्यांचा समाचार घेणार नाहींत.

**आ०**— आजारी पडलीं किंवा अशक्त झालीं तर एकमेकावर माया करणारीं जनावरें थोडकींच सांपडतील. आपला चिनाई

दिल्ह्या त्या तूं पाहिल्यासना मुला ?

रा०— होय; तूं त्यास कांहीं वेळ बाहेर काढलें होतेंस; परंतु मास्याच्या भांड्यांत पुनः टाकलें नाहीं इतक्यांत त्या सर्वांनी टोचून टोचून शेवटीं त्यास मारून टाकलें.

आ०— ठीक, कित्येक प्राणी आहेत त्यांस भूक लागली ह्मणजे तीं आपल्या स्वतःच्या पिल्लांसहि खावयास सोडीत नाहींत.



सोनेरी पंखाचा काष्टकुट्टक.

रा०— अरेरे! प्राण्यानी एकमेकास खावें असा ईश्वराचा हेतु खराच असेल काय ?

आ०— शरिर जाणणारे वैद्य असें ह्मणतात कीं सिंह, वाघ, कोल्हा, आणि ह्यांसारिखे दुसरे पुष्कळ हिंस्र प्राणी यांचे दांत नुसतें मास खाण्याकरितां केले आहेत असें दिसतें.

रा०— बरें तेच दांत चार खावयास चालणार नाहींत.

आ०— केवळ तसे चालणार नाहींत. जनावरांच्या इंद्रियाचा अणखी अधिक शोध करितां असें सिद्ध होतें कीं अशा प्रकारच्या दांतांस मास पाचन करण्याची शक्ति आहे आणि चर-

आहे.

रा०— आई, हा तरी मोठा चमत्कार आहे.

आ०— अणखी या हिंस्रपशूंस व पक्ष्यांस त्यांचे त्यांचे भक्ष्याचे प्राणी धरायास आणि हिंसा करायास तरतऱ्हेचीं हत्यारें असतात. याप्रमाणें ज्या पक्ष्यांस मासळीं आवडती त्यांच्या पंज्यांच्या आंतल्या बाजूस खाचीं आहेत तेणेंकरून त्यांस आपला बुळबुळीत भक्ष्य घट्ट धरायास चांगलें फावतें. काष्टकुट्टक आणि सरडा यांस त्यांचा कीटक भक्ष्य धरण्याकरितां एका तऱ्हेच्याच जिभा दिल्या आहेत.

रा०— आई, हत्ती मास खातात?

आ०— नाहीं, माझ्या बा; त्यांस वनस्पतीचा भक्ष्य आवडतो. वास्तविक, अलीकडे ज्या मोठमोठे जनावरांचा शोध लागला आहे त्यांतून बहुतेकांस हाच सात्विक आहार आवडतो; आणि कृपाळु ईश्वरानें ही तरी एक मोठीच योजना करून ठेविली आहे, कां कीं पशु जो जो भक्ष्य खातो त्या त्याप्रमाणें त्याचा स्वभाव होत जातो.

रा०— हं हं, तसा होतो काय?

आ०— पशुशाळांचे रखवालदार सांगतात कीं हिंस्रपशूंस मासाचा यथेच्छ आहार मिळाला ह्मणजे ते फारच क्रूर होतात ह्मणून जरी त्यांस नेहमी मास घालावें लागतें तरी ते जिवंत प्राणी त्यांला खायाला देत नाहींत कां कीं तसे जीवंत प्राणी खाऊं दिल्हे तर ते एकाद्या दिवसीं रखवालदारांसहि खावयास चुकणार नाहींत. पाहा आपले पाळलेले घोडे व मांजरी यांस तसाच कांहीं भक्ष्य मिळाला तर तेहि नेहमीपेक्षां किती अधिक चपळता दाखवितात.

रा०— बरें, जनावरें आपल्या शत्रूंस भीत असतील कीं नाहीं?

आ०— होय भितात, पण त्यांस साहजिक ज्ञान आहे, तेणेंकरून ते शत्रुपासून पळून जाण्याचा यत्न करितात.

रा०— काय मरणाच्या भयामुळें?

आ०— गरीब मेंढे आणि ढोर यांविषयीं असें सांगतात कीं

तीं मरणाच्या भयामुळें असें केवळ सांगवत नाहीं.

**रा०**— कदाचित तीं तेथें दुसऱ्या मेंढ्यांचीं किंवा ढोरांचीं धडें पाहत असतील.

**आ०**— होय, तसेंहि असेल; परंतु जलप्रलय झाला त्याकाळीं नोहा नामक जो मनुष्य वांचला त्यास ईश्वराने असें सांगितलें कीं सर्व जनावरें मनुष्याच्या धाकांत राहतील आणि त्याप्रमाणें आजदिवसपर्यंत दृष्टीस पडत आहे.

**रा०**— आई, जलप्रलय होण्याच्या पूर्वीचीं जनावरें एकमेकांस खात होतीं कीं नाहीं हें मला सांगसील बरें?

**आ०**— खात असतील असें दिसतें, कां कीं जलप्रलय होण्याच्या पूर्वीच्या जनावराचे कांहीं पांजरें सांपडले त्यांस मास खाण्याजोगे दांत आणि भक्ष्य धरून मारायाचे पंजेहि तसेच आहेत. आणि त्यांच्या पांजरांत अर्धीं पचन झालेलीं हाडें व आसपास पडलेलीं खवलें सांपडलीं त्यावरून तर त्या गोष्टीचा कांहींच संशय राहिला नाहीं.

**रा०**— आहा, यावरून माझ्या मनांत एक प्रश्न विचारायाचा होता त्याची आतां मला आठवण झाली. आई, हे सर्व प्राणी आपला भक्ष्य खाते समयीं त्यांवरचे केस अथवा पिसेंहि खात असतील ना?

**आ०**— होय, पण जे भाग खाल्ल्यावर जिरत नाहींत त्यांच्या गोळ्या होऊन बाहेर पडतात. केसांच्या लहान गुंड्या आणि कीटकांचीं खवलें जवळ पडलेलीं असतात त्यांवरून पक्ष्यांच्या घरोट्यांचा व हिंस्रपशूच्या जाळीचा लागलाच शोध लागतो.

**रा०**— मला वाटतें आई सृष्टीचा क्रम जसा चालला आहे तसाच चालल्याने फार उत्तम आहे.

**आ०**— निःसंशय तसेंच मुला; कां कीं सर्व ईश्वराच्या आज्ञेने व ज्ञानाने चाललें आहे. त्यानेच सर्व पशु केले, आणि जेव्हां सिंह आणि कावळ्यांचीं पिलीं भक्ष्यासाठीं त्याला हाका



त शिकविता.

**रा०**— आई, मोठ्या जनावरांपेक्षां लहान कीटक अधिक आहेतसे दिसतात. आतां पाहा तेथें चिलटांच्या किती झुंडीच्या झुंडी उडत आहेत; तशाच प्रत्येक वारुळांतहि किती हजारोहजार मुंग्या दृष्टीस पडतात.

**आ०**— सृष्टिजन्य पदार्थांचा शोध करणारे असें सांगतात कीं प्रकृतीच्या प्रत्येक भागांत समन्वय किंवा साम्यता सर्वत्र दिसून येते. हे अति क्षुल्लक कीटक जे उन्हाळ्यांत हजारोहजार उत्पन्न होतात ते फारसे वांचत नाहींत, लवकरच मरून जातात किंवा त्यांस मोठाले प्राणी खाऊन टाकतात. मोठमोठ्या जनावरांची चालचर्या पाहतां असें समजलें कीं ज्या प्राण्यांस पुष्कळ भक्ष्य लागतो व जीं मोठीं भयंकर आहेत त्यांस थोडकींच पिलीं होतात. पेली ह्मणून विलायतेंत कोणी महान पंडीत होऊन गेला तो असें ह्मणतो कीं, 'हत्तीला एकच वत्स होतें;' फुलपाखरूं साहाशें आंडीं घालतें; शिकारीचे पक्षी दोन आंड्यापेक्षां अधिक क्वचितच घालतात. नदींत आणि तसेंच समुद्रांत एक मुशी होतो तेव्हां हजारो लाखोवरीं बारीक मासळी होतात.

**रा०**— हें फारच चमत्कारिक. परंतु जेव्हां पाहावें तेव्हां मनुष्यासाठीं पुष्कळ भक्ष्य असतो इतका कीं त्याच्यानें कधीं खाववणार नाहीं.

**आ०**— हें ईश्वराच्या औदार्यानें घडलें आहे मुला, पाहा, कीं इतर जनावरांस त्यांच्या दांतांच्या कृतीवरून व पाचन शक्तीवरून अमुकच प्रकारचा भक्ष्य खावा असी मर्यादा करून ठेविली तसी मनुष्यास ठेविली नाहीं, त्यानें सर्व प्रकारचा भक्ष्य खावा असी त्यावर ईश्वरानें कृपा केली आहे.

**रा०**— सर्व प्रकारचा खावा? काय, साप आणि मगराहि?

**आ०**— होय, टोळांपासून देवमासे किडीं आदिकरून सर्व प्राणी; मत्स्य, जनावरें, पक्षी, कच्ची किंवा रांधलेलीं; झाडांची मुळें, पानें आणि फळें कोणताहि पदार्थ ज्याच्या आंगीं विष नाहीं

व पुष्टकारक असोत ही गोष्ट वेगळी.

**रा०**— आई, जनावरांस पुनर्जन्म आहे ?

**आ०**— मुला, ख्रिस्ती शास्त्राप्रमाणें त्यांस असेल असें अनुमान करण्यास कांहींच आधार दिसत नाहीं.

**रा०**— तर ईश्वराने त्यांच्या आच्छादनाकरितां व अपेक्षा पुरविण्याकरितां एवढी मोठी करामत केली असून तीं इतका अल्पकाळ राहावीं हें केवढे आश्चर्य !

**आ०**— मुला, अशा अल्पकाळ राहणाऱ्या प्राण्यांस ईश्वर इतकी शोभा देतो व त्यांजकरितां इतका मेहनत घेतो म्हणून त्याच्या अपार युक्तीचें व औदार्याचें आपण किती अधिकाधिक आश्चर्य करावें बरें ?

**रा०**— खरें आई, शिंप्यांतले जीव व कृमी हे जरी सुंदर नाहींत तथापि ईश्वराने त्यांस मोर व सिंह यांसारिखेच उपयोगी व चमत्कारिक केलें आहे असें दिसतें.

**आ०**— मुला, ईश्वर आपलीं कृत्यें कांहीं मनुष्यांस दाखवून करीत नाहीं; परंतु त्याचीं कृत्यें असीं ठीकठाक व यथायोग्य होतात कीं, तीं पाहून अमुक असें केलें असतें तर बरें होतें, ही कल्पना आपल्याच्याने कधीं करवत नाहीं.

**रा०**— बरें आई, ईश्वरकृपेने मी आपलीं सर्व कृत्यें नेहमी उत्कृष्ट रीतीने करायाचा यत्न करीन.

**आ०**— अणखी माझ्या प्रिय राबट, दयाळू ईश्वराची दृष्टि तुझ्यावर सतत आहे हें लक्षांत ठेवून त्याप्रमाणें तूं वर्तणूक करीत जा. जर तुझा ईश्वरावर खराच विश्वास आहे आणि त्यावर खरीच प्रीति करितोस तर ती प्रीति दाखवायास नेहमी त्याच्या आज्ञेप्रमाणें चाल व त्याचीं सर्व चमत्कारिक कृत्यें पाहून सर्वदा स्तुति कर.

**समाप्त.**

